

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन



अनुक्रमणिका

श्री

मराठी अभ्यास परिषद पत्रिका

# भाषा आणि जीवन

वर्ष २० : अंक १ हिवाळा २००२

केयूराणि न भूषयन्ति पुरुषं हारा न चन्द्रोज्ज्वला
न स्नानं न विलेपनं न कुसुमं वाऽलंकृता मूर्धजाः।
वाण्येका समलंकरोति पुरुषं या संस्कृता धार्यते
क्षीयन्ते खलु भूषणानि सततं वाग्भूषणं भूषणम् ॥

अनुक्रमणिका







# अनुक्रमणिका



---

**प्रकाशन : त्रैमासिक** (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)
**संपादन - समिती :** मृणालिनी शहा (प्रमुख), अशोक रा. केळकर,
गं. ना. जोगळेकर, मॅक्सीन बर्नसन, प्र. ना. परांजपे, द. दि. पुंडे,
आशा मुंडले, अंजली सोमण, विजया देव, नीलिमा गुंडी
**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** मृणालिनी शहा, १, शीतल अपार्टमेंट,
४६/४, एरंडवणे, पुणे ४११ ००४. दू. क्र. ५४३३८६९
pravinshah@ip.eth.net
**व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** नीलिमा गुंडी, ३, अन्नपूर्णा, १२५९,
शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर,
पुणे ४११ ००२. दू. क्र. ४४८६०१५
**पत्रिकेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पहा.



---

**संपादक :** मृणालिनी शहा,
**प्रकाशक व मुद्रक :** मराठी अभ्यास परिषदेसाठी नीलिमा गुंडी
**मुद्रण स्थळ :** पद्मरेखा आर्ट्स, १९४/२, नवी पेठ, पुणे ४११ ०३०.

संपादकीय

# भाषेचे अध्यात्म

'शब्द बापुडे केवळ वारा' हे खरे असले तरी शब्दातूनच मानवी संस्कृतीचा आविष्कार होतो, पुढच्या पिढ्यांपर्यंत ती पोचू शकते. श्वासोच्छ्वासाला माणूस शब्दरुप देतो आणि मग त्या शब्दाचा अनेक तऱ्हांनी उपयोग करतो. भाजीबाजारात घासाघीस करण्यापासून 'ओम्'काराच्या चिंतनापर्यंत जीवनाच्या सर्व क्षेत्रांत माणूस शब्द वापरतो. शब्दाच्या साहचर्याशिवाय माणसाला विचारसुद्धा करता येत नाही. म्हणूनच माणसाला आपल्या भाषेबद्दल प्रेम वाटते, अभिमान वाटतो. तिच्यासाठी लढताना तो प्रसंगी प्राणही गमवायला तयार होतो.

पण भाषा व्यक्तीपुरती मर्यादित नसते. तिचा एक स्तर व्यक्तिगत असतो तर इतर अनेक स्तर सामूहिक, सामाजिक असतात. व्यक्तींमधील आणि समूहांमधील विनिमयात भाषा अनेक भूमिका बजावित असते. त्यामुळे ती अनेक सामाजिक शास्त्रांच्या अभ्यासाचा विषय बनते. तिच्याशी संबंधित असे अनेक वाद निर्माण होतात आणि तिच्याशी कसा व्यवहार करावयाचा याबद्दल अनेक प्रश्न उभे राहातात.

शिक्षण-व्यवस्थेतील भाषेच्या स्थानाबद्दल आज कोलाहल माजला आहे. पण मला प्रश्न पडतो की भाषेतून मिळणाऱ्या आनंदाचा आपण विचार करतो आहोत का? तो आनंद प्रत्येकाला मिळवता यावा यासाठी आपण प्रयत्न करतो आहोत का?

श्वासोच्छ्वासाचंच आपण उदाहरण घेऊ. श्वासोच्छ्वास करता येणं म्हणजे जिवंत असणं. पण फक्त जिवंत राहाणं हेच आपलं ध्येय असतं का? जिवंत राहण्याबरोबरच त्यातला आनंद मिळवता आला नाही तर ते जिवंत राहाणं निरर्थकच नाही का? आहार, निद्रा, भय आणि मैथुन अशी जिवंतपणाची अंगं मानव आणि पशू यांच्यात समानच असतात. पण पशूंपेक्षा मानव वेगळा ठरतो तो त्याच्या जीवनातून आनंद मिळवण्याच्या धडपडीमुळं, त्याच्यातील आनंद मिळवता येण्याच्या सुप्त सामर्थ्यामुळं.



अनुक्रमणिका

जीवनाच्या प्रत्येक घटकातून आनंद मिळवण्याचा आपण प्रयत्न करतो. श्वासोच्छ्वासाचं नियमन करत आपण प्राणायामापर्यंत पोचतो आणि त्यातून आपल्या अंतर्मनाचे साक्षीदार बनून ब्रह्मानंद मिळवण्याचा प्रयत्न करतो. शब्दाचा ध्वनी, त्याचं वजन, शब्द-शब्दांमधील नातं जाणण्याची धडपड करतो आणि त्यांच्या आविष्कारातून आनंद मिळवतो. तो आनंदही 'ब्रह्मानंद सहोदर' असतो.

एका आर्थिक गुन्हेगाराच्या मृत्यूची बातमी देताना एका प्रतिष्ठित दैनिकानं लिहिलं होतं की त्याच्या मृतदेहावर हिंदू धर्मशास्त्राप्रमाणे "मंत्रोच्चारांच्या गजरात" अंत्यसंस्कार करण्यात आले. ते वाचताना अंत्यसंस्काराच्या मंत्रांच्या संदर्भात वापरलेल्या 'गजर' या शब्दामुळं मला वेदना झाल्या. याउलट चांगल्या लेखकांच्या सहज, साध्या, प्रवाही, काव्यमय भाषेमुळं मला आनंद मिळतो. शांता शेळक्यांचे सहज, सोपे, प्रवाही गद्य, श्रीनिवास विनायक कुलकर्ण्यांचे काव्यमय गद्य, कुसुमाग्रजांच्या 'गर्जा जयजयकार', 'अहिनकुल'च्या भाषेतली आक्रमकता आणि 'स्वप्नाची समाप्ती', 'पृथ्वीचे प्रेमगीत'च्या भाषेतली आर्तता यांमुळं आनंदाच्या विविध परींचा मला अनुभव येतो.

शरीराच्या आरोग्यामुळं आपण शारीरिक निरामयतेचा अनुभव घेतो, आवडते काम पूर्ण क्षमतेने करण्यामुळं मानसिक निरामयतेचा अनुभव घेतो. त्याचप्रमाणं विविध संदर्भातील भाषेच्या सौंदर्यपूर्ण, सौष्ठवपूर्ण, प्रयोजनपूर्ण वापरामुळं आपण आध्यात्मिक आनंदाचा अनुभव घेऊ शकतो. "शब्दब्रह्म" या समासाचा मला उमजलेला अर्थ हा आहे.

■

**प्रभाकर नारायण परांजपे**

मुखपृष्ठावरील भर्तृहरिच्या श्लोकाचे वामन पंडितांनी केलेले समश्लोकी रूपांतर -

सद्रत्न हार मणि ताईत बाहुदंडी । कीं स्नान चंदन फुलें आणि लांब शेंडी ॥
यांनी खरी घडतसे पुरूषा न शोभा । वाणीच भूषण सुशिक्षित शब्दगर्भा ॥

# कानडा विठ्ठलु

•

सुधीर रसाळ

'कानडा-कानडे' हा शब्द मध्ययुगीन साहित्यात बऱ्याच ठिकाणी आला आहे. ज्ञानेश्वरीत तो तीन-चार ठिकाणी वापरला गेला आहे. तसेच ज्ञानेश्वरांच्या 'पांडुरंगकांती...' या अभंगात 'कानडा विठ्ठलु कर्नाटकु । येणे मज लावियला वेधु ।' या ओळीत तो आला आहे. नामदेवांच्या अभंगातही तो दोन-तीन ठिकाणी आलेला दिसतो.

मध्ययुगीन साहित्याच्या संशोधकांनी-संपादकांनी त्याचा अर्थ 'अवघड, दुर्बोध, दु:साध्य' असा दिला आहे. 'कानडा' शब्दाचा हा अर्थ घेतल्यास, तो शब्द असलेल्या ओव्या-अभंग जरी कळत असले तरी त्याने आपले पूर्ण समाधान होत नाही - कारण या शब्दाचा हाच अर्थ का घ्यायचा, असा प्रश्न मनात डाचत राहतो. ज्ञानेश्वरांच्या 'पांडुरंगकांती...' या अभंगाच्या विवरणात प्र. न. जोशी यांनी हाच अर्थ जरी दिला असला तरी तो देताना आपले असमाधान सूचित केले आहे. ते म्हणतात, '... वर्णनाच्या ओघात 'कानडा हो विठ्ठलु कर्नाटकु' असून त्यानेच माझ्या मनास वेध लावला असल्याचे म्हटले आहे. कानडे म्हणजे कळण्यास कठीण असा एक अर्थ होऊ शकतो, पण विठ्ठल नामस्मरणामुळे सुलभ असल्याचाच सर्वांनी दाखला दिलेला आहे. मग या विठ्ठलाचा कर्नाटकाशी वा कानडी प्रांताशी संबंध कोणता?..." असा प्रश्न उपस्थित करून त्यांनी हा संबंध आपल्या विवरणात स्पष्ट केला आहे. 'कानडा विठ्ठलु' म्हणजे 'कानडी प्रांतातला विठ्ठल' असा अर्थ करण्याकडे प्र. न. जोशी यांचा कल आहे. 'कानडा' या शब्दाच्या उच्चारणाबरोबर 'कानडी माणूस' हाच अर्थ आपल्या मनात येतो. आपण जर हा अर्थ स्वीकारला तर ज्ञानेश्वरांच्या या अभंगात द्विरुक्ती होते; परंतु अशा द्विरुक्तीतून ते काहीच साधताना दिसत नसल्यामुळे 'त्यांनी ती का करावी' असा प्रश्न आपल्या मनात उभा राहतो. तेव्हा या अभंगाच्या संदर्भात 'कानडा' म्हणजे 'कानडी प्रदेशातला' हा अर्थ घेणे मनाला पटत नाही. तेव्हा 'कानडा' या शब्दाच्या अर्थाचा शोध वेगळ्या प्रकारे घेतला पाहिजे.










'कानडा' हा शब्द 'कानोडा' या रूपात आजही मराठवाड्यात वापरला जातो. तेव्हा या शब्दाला असलेले अर्थ आपणांस काही मदत करतात काय, हे तपासले पाहिजे. जेवताना जर वाढलेले कालवण ताटभर पसरू लागले तर, 'ताटाला वटकन (किंवा उटकन) लाव आणि ताट कानोडे कर.' असा सल्ला दिला जातो. अडणीवर माठ कित्येकदा कानोडा ठेवला जातो व तो सरळ करणे गरजेचे असते. चुलीवरचे भगोणे जर कानोडे बसलेले असले, तर आतला उकळणारा पातळ पदार्थ उतू जाण्याचा संभव असतो. बसमध्ये चढलेला प्रवासी बाकड्यावर बसलेल्यांना 'थोडं थोडं कानोडं व्हा म्हणजे मला जागा होईल.' असे म्हणून बसायला जागा पटकावतो. अनेकांना 'कानोडे' म्हणजे एका कुशीवर झोपायची सवय असते. या सर्व ठिकाणी 'कानोडा' याचा अर्थ 'तिरपा, वाकडा, एका बाजूस कललेला' असा आहे. कानोडे ठेवणे, कानोडे बसणे, कानोडे उभे राहणे, कानोडे झोपणे या प्रकारच्या कृतींसाठी तो वापरला जातो. तिरप्या, वाकड्या, कललेल्या अवस्थेतील व्यक्ती, वस्तू यांसाठी 'कानोडा, कानोडं' हे विशेषण वापरले जाते. 'कानाकोपरा' असाही एक शब्द मराठीत आहे. दृष्टीच्या टप्प्यात सरळपणे, सहजपणे न येणारा खोलीचा जो कोपरा त्याला 'कानाकोपरा' म्हणतात. कानाकोपरा हा अंधारलेलाच असतो. विभक्तीप्रत्यय लागण्यापूर्वी या शब्दाचे 'कान्याकोपऱ्या' किंवा 'कानाकोपऱ्या' असे सामान्यरूप होते. नकोशा असलेल्या वस्तू दृष्टिआड, कान्याकोपऱ्यात ठेवायची पद्धत आहे. मुलाला नकोसे झालेले म्हातारे आईबाप 'आता ठेवा आम्हांला कान्याकोपऱ्यात.' असे त्राग्याने म्हणतात. 'दृष्टीच्या टप्प्यात न येणारी गोष्ट' या संदर्भामुळे 'अंधुक, अस्पष्ट म्हणून अनाकलनीय' इत्यादी अर्थच्छटा 'काना' या शब्दाला प्राप्त झाल्या आहेत. 'कानाडोळा' या शब्दाला स्पष्टपणे 'दृष्टीच्या टप्प्यात न येणारी गोष्ट,' हा संदर्भ प्राप्त झाला आहे. पाहिले असता न पाहिले असे दर्शविणे, दुर्लक्ष करणे, नजरेच्या टप्प्यापासून दूर ठेवणे हे अर्थ 'कानाडोळा करणे' या वाक्प्रयोगास प्राप्त झाले आहेत. 'कानाकोपरा' आणि 'कानाडोळा' या शब्दातील 'काना' या पदाला 'नजरेच्या टप्प्यापासून बाजूला असण्याचा,' 'दिसण्याच्या - म्हणून आकलनाच्या कक्षेत न येण्याचा' हे अर्थ प्राप्त झाले असून ते 'दुर्बोधता, अनाकलनीयता, संदिग्धता, अस्पष्टता' या अर्थांकडे आपणास नेऊ पाहतात.

या सर्व ठिकाणी येणारा 'काना' हा शब्द संस्कृतमधील 'काण' या शब्दापासून निष्पन्न झाला आहे. 'काण' म्हणजे एका डोळ्याचा, तिरळा,

चकणा.' एका डोळ्याच्या माणसाच्या नजरेच्या टप्प्यात एका बाजूच्या गोष्टी येत नाहीत. त्या त्याला 'अनाकलनीय'च राहतात. तिरळ्या किंवा चकण्या माणसाच्या एका डोळ्याची भावली तिरपी, वाकडी असल्यामुळे पाहताना त्याचे दोन्ही डोळे एकाच दृश्यावर केंद्रित झाल्याचे वाटत नाही. त्यामुळे हा माणूस नेमका कोठे पाहत आहे, त्याचे लक्ष कोठे आहे हे कळत नाही. तो जे पाहात आहे असे आपल्याला वाटते ते तो पाहतच नसतो आणि त्याने जे पाहिले नाही असे आपणांस वाटते ते नेमके त्याने पाहिलेले असते. हे परमेश्वराच्या पाहण्याचेही वैशिष्ट्य आहे. परमेश्वर सगळेच पाहात असतो; परंतु त्याने अमुक एक (म्हणजे माणसाचे पापकृत्य) पाहिलेले नसावे अशी माणूस स्वतःची समजूत करून घेतो. या दृष्टीने परमेश्वर (म्हणजे विठ्ठल) 'काना'च आहे. कान्या, तिरळ्या माणसाच्या पाहण्याबद्दल आपणांस संदिग्धता वाटत असते. इतरांच्या सहसा लक्षात न येणाऱ्या गोष्टी ज्याला कळतात आणि हे आपल्याला कळले आहे हे जो इतरांपासून लपवू शकतो त्याला 'काना' हे विशेषण लावले जाते. यामुळे चतुर, शहाणा, मर्म जाणणारा या अर्थच्छटा 'काना' या शब्दाशी संलग्न झाल्या आहेत. हे सर्व परमेश्वराचे (म्हणजे विठ्ठलाचे) विशेष आहेत. इतरांच्या ध्यानात न येणाऱ्या गोष्टी कळण्यातून माणसाचे जे वागणे-बोलणे होते ते पाहणाऱ्यास-ऐकणाऱ्यास दुर्बोध, संदिग्ध, अनाकलनीय वाटत असते. परमेश्वर कृपाळू आहे, परंतु भक्तावर तो संकटे आणतो. कृपाळू असून तो असे का वागतो? याचे उत्तर असे, की जे आपल्याला कळू शकत नाही असे काहीतरी त्याला कळलेले असणार; म्हणूनच तो भक्ताला संकटात लोटीत आहे! लक्षणेने निष्कर्ष असा की परमेश्वर 'काना' आहे! 'तिरळा' या शब्दाचाही अर्थ असाच आहे. 'तिर्यक्,' 'तिरस्' या संस्कृत शब्दांपासून 'तिर' हे पद सिद्ध झाले. तिरपा, तिरसट, तिरपागडे, तिरसिंगराव, तिरमिरीत येणे, तिरस्कार या सर्व शब्दांतील 'तिर' हे पद 'काणा' या अर्थाचे असून दोहोंच्या अनेक अर्थच्छटा समान आहेत. थोडक्यात 'काना' या शब्दाचा मुख्यार्थ 'तिरळ्या डोळ्यांचा' हा असून 'तिरपा, वाकडा, कललेला' हे त्याचे मुख्यार्थाच्या अतिनिकटचे अर्थ आहेत. 'अनाकलनीय, संदिग्ध दुर्बोध' ह्या या मुख्यार्थाशी संलग्न अशा लक्षणेने प्राप्त झालेल्या अर्थच्छटा आहेत.

'कानडा' प्रमाणेच ज्ञानेश्वरीत 'कानवडा' हा शब्दही तीन-चार ठिकाणी येतो. 'कानडे' आणि 'कानवडे' हे भिन्नार्थी शब्द असल्याचे गृहीत धरले आहे. रा. ना. वेलिंगकर यांनी त्यांची स्वतंत्र नोंद करून 'कानडे' म्हणजे 'दुर्बोध,

अवघड, दु:साध्य' आणि 'कानवडे' म्हणजे 'लवंडलेले, कलंडलेले' असे अर्थ दिले आहेत. त्यांनी 'कानवडे ठाकणे' म्हणजे 'दुर्लक्ष करणे' असाही अर्थ नोंदवला आहे. वस्तुतः येथे 'तिरपे, वाकडे, पाठमोरे उभे राहणे' असा अर्थ आहे. ज्या वस्तूपासून तिरपे, वाकडे, पाठमोरे उभे राहिले जाते ती वस्तू उभे राहणाऱ्याच्या नजरेच्या टप्प्यात येणार नाही. म्हणून त्या वस्तूकडे त्याचे दुर्लक्ष होईल. येथे 'दुर्लक्ष होणे' हा अर्थ लक्षणेने प्राप्त झाला आहे. 'कानवडा ठाकणे' याच्या अर्थासाठी ज्ञानेश्वरीतील पुढील ओवी विचारात घेता येईल. गीतेचे माहात्म्य सांगताना ज्ञानेश्वर म्हणतात : 'नां येणेंसिं तोंड वांकुडें । करूनु ठाकाल कानवडे । तरि कानें हिं घेंति पडे । तें चि लेख' ॥ १८-१६७२ ॥ या ओवीवर भाष्य करताना 'कानवडे ठाकून' म्हणजे 'एका कुशीवर वळून' किंवा 'पडल्या पडल्या' किंवा 'निजलेल्या अवस्थेत' असा अर्थ घेतला गेला आहे. (पहा - 'सार्थ ज्ञानेश्वरी' संपा. शं. वा. दांडेकर आणि 'ज्ञानदेवी' खंड ३, संपा. मंगरूळकर - केळकर). वस्तुतः गीतेला विन्मुख होऊन, तिच्यापासून तोंड फिरवून, तिरपे होऊन जरी तुम्ही उभे राहिलात - (म्हणजे तुम्ही तिच्याकडे जरी लक्ष दिले नाही) तरी तुमच्या कानावर ती पडणारच आणि त्यामुळे तुम्हांला तिचे फळ मिळणारच, असा या ओवीचा अर्थ आहे. आपण कोण आहोत हे समोरच्यास कळू नये म्हणून किंवा समोरच्याची आपण दखलही घेत नाही हे दर्शवून त्याचा अनादर करण्यासाठी, समोरच्याबद्दल राग, तुच्छता, विरोध प्रकट करण्यासाठी माणसे 'कानडे, कानवडे होण्याची' कृती करीत असतात. नको वाटणारा माणूस समोर येताच आपले तोंड फिरवून, तिरपे होऊन, पाठमोरे होऊन, त्याला विन्मुख होत माणसे आपला भाव प्रकट करीत असतात. गीतेबद्दल ज्यांना आदर नाही, ज्यांना गीतेचे महत्त्व पटलेले नाही अशी माणसे गीता कानावर पडत असताना तोंड फिरवून ('तोंड वाकुंडें करूनु') 'कानवडे ठाकतात'. तरीही त्यांना गीता फळ देते; असे ज्ञानेश्वरांना म्हणायचे आहे. 'कानवडे ठाकणे' हे उपेक्षा, अनादर सूचित करणारे आहे. म्हणून उपर्युक्त ओवीनंतरच्या ओवीत गीतेच्या औदार्याबद्दल ज्ञानेश्वरांनी 'स्थूल दाता किं कोण्हातें । नास्ति न म्हणैल ॥' असे उद्गार काढले आहेत. तेव्हा 'कानडे, कानवडे' याचा मुख्यार्थ 'तिरपा, वाकडा, विन्मुख, कलंडलेला, कललेला' हा असून या अवस्थेशी संलग्न अशा अनेक अर्थच्छटा त्याला प्राप्त झाल्या आहेत. 'अस्पष्ट, संदिग्ध, अनाकलनीय, दुर्बोध, पूर्णतः न दिसणारे' या सर्व अर्थच्छटा या शब्दांशी निगडित आहेत. या सर्वांचे उगमस्थान 'काण' हा 'तिरळ्या डोळ्याचा, एका

डोळ्याचा' या अर्थाचा संस्कृत शब्द आहे. म्हणून काण, काना, कानडा, कानवडा, कानोडा ही एकाच मूळ शब्दाची, एकाच प्रकारचा अर्थ देणारी रूपे आहेत.

तिरपी, वाकडी वस्तू पाहणाऱ्यास पूर्णपणे दिसत नाही. कारण तिचा बराचसा भाग नजरेपासून झाकलेला असतो. तोंड फिरवून कानडा बसलेला माणूसही अंशतःच दिसत असल्यामुळे त्याचे पूर्ण रूप कळत नाही. म्हणून जे कानडे असते त्याचे अंशतःच आकलन होत असते. म्हणून 'कानडे' च्या विरोधी अर्थासाठी 'उघडे' हा शब्द योजिला जातो. ज्ञानेश्वरांची पुढील ओवी या दृष्टीने पाहता येईल. 'हें परिसतां जरि कानडें । तरि जाण पां पार्थु उघडें । श्रीकृष्णसूषाचें चि रूपडें । ओतलें आहे' ॥ ६-१२० ॥ या ओवीच्या आधी ज्ञानेश्वरांनी द्वैताद्वैतासंबंधीचा गुंतागुंतीचा विचार अर्जुनासमोर मांडला आहे. त्यानंतर या ओवीत ते म्हणतात, की हा विचार ऐकताना 'कानडा' (कानड्या स्थितीतील वस्तूसारखा अस्पष्ट, संदिग्ध, अनाकलनीय) जरी वाटला तरी पार्थ ही श्रीकृष्णसुखाची स्पष्ट, सहज कळण्यासारखी अशी ओतीव मूर्ती आहे, हे तू जाण. 'उघडा' (पूर्णतः आकलनीय) असलेला अर्जुन कळला की श्रीकृष्णसुख आपोआपच कळेल आणि ते कळणे म्हणजे परब्रह्माची प्रतीती येणे असल्यामुळे 'मीच परब्रह्म' हे ज्ञानही आपोआपच होईल. असे येथे ज्ञानेश्वरांना सांगायचे आहे. ज्ञानेश्वरांनी 'कानडा-उघडा' या विरोधार्थी शब्दांची योजना करून हा भक्तिमार्गाची सुलभता सूचित करणारा विचार मांडला आहे.

'कानडे' हा शब्द 'उघडे' या शब्दाच्या विरोधी अर्थाचा आहे हे स्पष्ट करणारे नामदेव आणि एकनाथ यांचे अभंग आपण पाहू. नामदेवांनी रंगविलेला विठ्ठल असा आहे - 'वेदांसी कानडा श्रुतीशी कानडा । विठ्ठल उघडा पंढरीये । नाम बरवें रूप बरवें । दर्शन बरवें कानडीयाचे । नामा म्हणे तुझे अवघेंचि बरवें । त्याहुनि बरवें प्रेम तुझे ॥' परब्रह्म हे वेदांना पूर्णपणे कळले नाही; ते भक्तांना मात्र पूर्णतः कळले आहे. हा भक्तिमार्गातील आवडता विचार आहे. तोच या अभंगात सूचित होतो. वेदांना - श्रुतींना अस्पष्ट असणारा (कारण वेदांनी त्याला अशा मार्गाने - ज्ञानमार्गाने पाहिले की त्यांना त्याचे अंशदर्शनच होऊ शकले. त्यांनी विठ्ठलाला जेथून पाहिले तेथून तो 'कानडा' दिसत होता. त्यामुळे वेदांना त्याच्या पूर्ण रूपाचे वर्णन करताच आले नाही.) पंढरपुरी मूर्त रूपात, उघडा, सर्वांना ज्याचे सर्वांगाने दर्शन होऊ शकेल अशा अवस्थेत प्रकट झाला आहे. त्यामुळे (वेदांना न कळलेले) त्याचे, त्याच्या नामरूपाचे, दर्शनाचे 'बरवेपण' भक्तांना सहजपणे

प्रत्ययाला आले आहे. वेदांना पाहावयास न मिळालेले ‘अवघेपण’ आणि अवघ्याचे बरवेपण भक्तांना मात्र सहजपणे पाहावयास मिळते. वेदातील परब्रह्म नामरूपगुणातीत अमूर्त असे आहे, म्हणून ते कानडे. पंढरीत हे परब्रह्म मूर्त, इंद्रियसंवेद्य रूपात आहे म्हणून ते उघडे. असे येथे नामदेवांना म्हणावयाचे आहे.

‘कानडे’ आणि ‘उघडे’ या जोडीची योजना करणारा एकनाथांचा अभंग पुढीलप्रमाणे -

‘तीर्थ कानडें देव कानडे । क्षेत्र कानडें पंढरीये ॥
विठ्ठल कानडे भक्त हे कानडे । पुंडलीकें उघडें
उभें केलें ॥ कानडीया देवा चालविले भक्तें ।
कवतुकें तयातें केलें ॥
एका जनार्दनी भक्तांचिया चाडा । विठ्ठल कानडा विटेवरी ॥’

तीर्थ, क्षेत्र, देव, विठ्ठल आणि भक्त हे सर्व अशा प्रकारचे आहेत की त्यांचा अर्थ पूर्णतः कळू शकत नाही. ह्या सर्व गोष्टी कशासाठी हे नीट कळत नाही. मुळात कानडा असलेला विठ्ठल पुंडलिकामुळेच उघडा, सरळ, सर्व अंगांनी पाहता येऊ शकेल असा उभा राहिला आणि तीर्थ, क्षेत्र विठ्ठल, भक्त या सर्वांचेच अर्थ आणि हेतू कळले. वस्तुतः देव भक्तांना चालवतो; त्यांचे नियंत्रण-नियमन करतो. येथे भक्तच देवांना चालवीत आहे. असे ‘कानडे,’ विपरीत, देव आणि भक्त यांच्या नात्याबद्दल घडते आहे, हेही एकनाथांना सांगायचे आहे. वस्तुतः जो अमूर्त आणि चराचर भरून राहिलेला असतो तो समूर्त होऊन भक्तांसाठी विटेवर विशिष्ट स्थळी उभा राहतो, हे या परब्रह्माचे वर्तनही कानडेच. ‘सगुण आणि निर्गुण’ यांतील अंतर्विरोधाची, परस्परछेदकत्वाची जाणीव ज्ञानेश्वरांपासून वारकरी संतांच्या ठिकाणी आहे. ही परस्परविरोधी रूपे त्यांनी स्वीकारली म्हणून त्यांनी विठ्ठलाला ‘कानडे’ हे विशेषण वापरले. जो निर्गुण असूनही ‘भक्तांचिया चाडा’ सगुण रूप धारण करतो. हे सगुणत्व कानड्या अवस्थेत असल्यामुळेच मूळचे निर्गुणत्व झाकलेले, अस्पष्ट राहते. सगुणत्वाच्या भक्तीमुळे परब्रह्माच्या निर्गुणत्वाचे ‘ज्ञान’ जरी होत नसले तरी त्याची आपोआप प्रतीती येते. हे सर्व ‘कानडे’ या विशेषणातून हे संत सुचवू पाहतात. एकनाथांनी आपल्या अभंगात या विशेषणाचा अनेकदा वापर केला आहे.

या संत वाङ्मयात येणारा ‘कानडा’ हा शब्द कन्नड भाषा, कन्नड भूप्रदेश यांच्याशी संलग्न नसून तो संस्कृतमधील ‘काण’ या शब्दापासून निष्पन्न झाला

आहे. आणि काना, कानडा, कानवडा, कानोडा ही याच शब्दाची एकाच अर्थाची रूपे आहेत हे आपण पाहिले. मराठीत 'डा' हा प्रत्यय जोडून साधित शब्द तयार केले जातात. तुच्छतेचा भाव प्रकट करण्यासाठी आणि जे वस्तुतः असायला नको तेच असल्याबद्दल प्रतिकूल भावना प्रकट करण्यासाठी शब्दास 'ड-डा-डे' ही प्रत्यये लावली जातात. 'काना' या शब्दास 'डा-डे' हे प्रत्यय जोडून कानडा, कानडे हे शब्द सिद्ध झाले आहेत. जे परब्रह्म सहजाकलनीय, स्पष्ट व पूर्णतः दिसणारे असायला हवे होते ते अनाकलनीय, अस्पष्ट व अंशतः दिसणारे आहे. हा प्रतिकूलतेचा, अपेक्षाभंगाचा भाव प्रकट करण्यासाठी 'कानडा-कानडे' ही रूपे वापरली गेली. या रूपाचे 'कन्नड' (कानडी भाषा) या शब्दाशी साम्य असल्यामुळे, 'कन्नड' या अर्थी हा शब्द स्वीकारण्याचा मोह होतो. नामदेवांच्या पुढील अभंगाबाबत हा मोह सहजपणे होतो. 'विठ्ठल कानडे बोलू जाणे । त्याची भाषा पुंडलिक नेणें ॥ युगें अठ्ठावीस जालीं । दोघां नाहीं बोलाबोली ॥ कर ठेवूनि कटावरी । उभा भिंवरेच्या तीरीं ॥ नामा म्हणे स्वामी माझा । उभा भक्तांचिया काजा ॥' हा अभंग वाचताना 'कानडे बोलू' याचा 'कन्नड भाषेत बोलणे' असा अर्थ चटकन मनात येतो; परंतु येथेही 'कानडे' ह्या शब्दाचा 'संदिग्ध अनाकलनीय' असाच अर्थ आहे. या अभंगात नामदेवांनी पुंडलिकाची कथा काहीशी बदलली आहे. आईवडिलांची सेवा करीत असताना विठ्ठल पुंडालिकास भेटावयास आला. 'सेवा समाप्त होईपर्यंत तू थांब. मग भेटू' असे सांगून पुंडलिकाने विठ्ठलास उभे राहण्यास वीट दिली. पुंडलिक जेव्हा विठ्ठलास भेटला तेव्हा त्याने 'भक्तांसाठी तू येथेच असेच उभे राहावेस' असा वर मागितला. त्याला अठ्ठावीस युगे झाली. अजूनही विठ्ठल पंढरीस विटेवर उभा आहे. ही मूळ कथा आहे. या अभंगामागे मात्र बदललेल्या रूपातली कथा आहे. आपण जर विठ्ठलाशी बोललो तर तो निरोप घेऊन द्वारकेला परत जाईल. मग भक्तांना त्याचे दर्शन कसे होणार? म्हणून आपणांस विठ्ठल काय बोलतो हे कळतच नाही असे भासवून पुंडलिक विठ्ठलाशी बोललाच नाही. पुंडलिकाशी न बोलता, त्याचा निरोप न घेता कसे जायचे? या विचाराने विठ्ठल अठ्ठावीस युगांपासून पुंडलिकाचा निरोप घेण्यासाठी विटेवर उभाच आहे! पुंडलिकाचे केवढे उपकार! त्याने विठ्ठलाला पंढरीत अशाप्रकारे रोखून ठेवले! आणि विठ्ठलाचे भक्तावर केवढे प्रेम! तोही भक्ताच्या 'काजा'साठी अठ्ठावीस युगांपासून तेथेच उभा आहे. पुंडलिकाला विठ्ठलाची भाषा कळत नाही असे नाही, पण तो जे दार्शनिक स्वरूपाचे बोलत आहे, त्याचा आशय

मात्र त्याला कळत नाही. त्यामुळे दोघांची 'बोलाबोली' होऊ शकत नाही असेही नामदेवांना म्हणायचे आहे. येथे विठ्ठलाचे विश्वरहस्याबद्दलचे गूढ बोलणे पुंडलिकास कळले नाही, या अर्थाकडेही अंगुलीनिर्देश केला गेला आहे. या दोन्ही अर्थांनी विठ्ठलाचे बोल कानडे आहेत. 'विठ्ठलाचे कानडे बोल' म्हणजे 'कन्नड भाषेतले बोल' असा अर्थ घेतल्यास या अभंगास अनेकपदरी सार्थता लाभत नाही.

आता आपण 'कानडा' शब्दाच्या संदर्भात ज्ञानेश्वरांच्या 'पांडुरंगकांती...' या अभंगाचा विचार करू. हा अभंग पुढीलप्रमाणे - 'पांडुरंगकांती दिव्य तेज झळकती । रत्नकीळा फांकती प्रभा । अगणित लावण्य तेजः पुंजाळलें । न वर्णवे तेथींची शोभा ॥ कानडा हो विठ्ठलु कर्नाटकु । येणे मज लावियला वेधु । खोळबुंथी घेऊनि खुणाची पालवी । आळविल्या नेदी सादु ॥ शब्देंविण संवादु दुजेवीण अनुवादु । हे तव कैसेनि गमे । परेहि परतें बोलणे खुंटलें । वैखरी कैसेंनि सांगे ॥ पाया पडूं गेलें तंव पाउलचि न दिसे । उभाचि स्वयंभु असे । समोर की पाठमोरा न कळे । ठकचि पडलें कैसें ॥ क्षेमालागीं जीव उतावीळ माझा । म्हणवूनि स्फुरताती बाही । क्षेम देऊं गेलें तंव मीचि मी एकली । आसावला जीव राहो ॥ बाप रखुमादेविवरु हृदयीचा जाणुनी । अनुभव सौरसु केला । दृष्टीचा डोळां पाहों मी गेलीये । तंव भीतरीं पालटु झाला ॥' या अभंगाच्या पहिल्या कडव्यात विठ्ठलाच्या तेजस्वी, डोळे दिपवणाऱ्या प्रभेचे वर्णन केले आहे. अशा प्रकारचे तेज ज्या पदार्थातून बाहेर पडते त्या पदार्थाचा आकार निश्चित करणाऱ्या रेषा दिसत नाहीत. त्यामुळे तो पदार्थ कसा आहे हे ध्यानात येऊ शकत नाही. विठ्ठलाची ही तेज:पुंजता त्याला अनाकलनीय बनवणारी आहे. त्याचे हे वर्णन करून झाल्यावर तो 'कानडा' असल्याचा उल्लेख येतो. विठ्ठलाच्या कानडेपणाच्या संदर्भात त्याच्या प्रखर तेज:पुंजतेचा उल्लेख अर्थपूर्ण आहे. तो परब्रह्म असल्याने जसा अनाकलनीय आहे तसेच त्याच्या तेज:पुंज रूपामुळेही तो अनाकलनीय आहे. दोन्ही अर्थांनी तो 'कानडा' आहे. येथून पुढच्या सर्व ओळी त्याच्या कानडेपणाचेच वर्णन करणाऱ्या आहेत. अशा कानड्या विठ्ठलाने 'तिला' वेध लावला आहे. त्याच्या आकर्षणाने, त्याच्या मोहाने ती झपाटलेली आहे. त्याने खोळबुंथी पांघरल्यामुळे तिला तो दिसू शकत नाही. त्याच्या मनात तिच्याविषयी कोणते भाव आहेत हे त्याच्या झाकलेल्या चेहऱ्यामुळे आणि डोळ्यांमुळे तिला कळू शकत नाहीत. त्याने पांघरलेली खोळबुंथी अर्थातच प्रखर तेजाची आहे. ती जर कापडाची, वस्त्राची आहे असे मानले तर ती पांघरल्यावर त्याच्या कांतीचे, लावण्याचे तेज झाकले जाईल. त्यामुळे या तेजाचा

तिला प्रत्ययच येणार नाही. आणि तो जर येणार नसेल तर 'अगणित लावण्य तेजः पुंजाळले' असे तिला म्हणताच येणार नाही. तेव्हा त्याने तेजाची खोळबुंथी पांघरली आहे, असा अर्थ घ्यावा लागतो. प्रखर तेजाची खोळबुंथी घेऊन तो हाताने केवळ खुणावतो आहे. त्याच्या या तेजाच्या वेषामुळे आणि तो करीत असलेल्या अगम्य खुणांमुळे तो कोण-कसा आहे आणि तो काय सांगतो आहे हे कळत नाही. त्यामुळेही तो 'कानडा' वाटतो आहे. ती तिच्या भाषेत त्याची आळवणी करते, परंतु तो तिला प्रतिसाद देत नाही. तिचे बोलणे त्याला कळत नाही काय? माहीत नाही. तेव्हा त्याच्याशी शब्दांशिवाय संवाद कसा साधावा आणि तो करीत असलेल्या खुणांचा अर्थ समजावून सांगणारा कोणी 'दुजा' नसल्यामुळे त्या आपल्या आपण कशा समजून घ्याव्या, हे कळतच नाही. परावाणीच्या पातळीवर जेथे, बोलणे खुंटते अशा 'अगम्य, कानडा' असलेल्याशी साध्या वैखरीने कसे बोलावे? येथून पुढच्या कडव्यांमधून ज्ञानेश्वर त्याचे 'कानडे' पण चित्रित करतात. त्यांची विरहिणी म्हणते, की त्याच्या पाया पडू गेले तर पावले दिसत नाहीत; परंतु तो उभा असल्याचे मात्र दिसते. तो आपल्या सन्मुख उभा आहे की, तोंड फिरवून पाठमोरा उभा आहे हेच कळत नाही. त्याला आलिंगन देऊ गेले तर आपल्या बाहूत तो नाहीच, आपण एकट्याच आहोत असे लक्षात येते. मग आपल्याला नवीच जाणीव होते. तो आपल्या बाहेर नाहीच; तो आपल्या हृदयातच आहे. या दृष्टीने मी जेव्हा त्याला पाहू लागले तेव्हा माझे अंतर पालटले, तेथे तो असल्याचे ज्ञान मला झाले आणि हा अनुभव अतिशय सुखदायक वाटला. तो सगुण रूपात दिसतो पण या रूपात तो गवसत नाही, हेच त्याचे 'कानडे' पण. तो हृदयी गवसतो पण रूपगुणात त्याचा प्रत्यय येत नाही. हेही त्याचे 'कानडे' पण. विठ्ठलाच्या अशा कानडेपणाचा प्रत्यय देणारा हा अभंग आहे. 'कानडा' म्हणजे "कन्नड-भाषक, कानडी प्रदेशातला" हे अर्थ जर घेतले तर या अभंगाची सार्थता खूपच उणावते. तेव्हा 'काण' या शब्दापासून सिद्ध झालेला 'कानडा' हाच या अभंगात योजिलेला आहे असे म्हणणे सयुक्तिक ठरते.

■

**१००, श्रेयनगर, नवा उस्मानपुरा, औरंगाबाद ४३१ ००५.**



अनुक्रमणिका

# उच्चार गुल्ला!

शरदिनी मोहिते

अनेकानेक कारणांनी इंग्लिश भाषा भारतीयांच्या जीवनात अवतरली. तिने आपल्या कित्येक शब्दांद्वारा रोज वापरातले आपले स्थान अढळ करून ठेवले आहे. या विषयाची चर्चा अनेकांनी अनेक प्रकारे केलेली आहे. मी एवढेच म्हणेन, की एखादा एतद्देशीय शब्द एखाद्याने वापरला तर त्याचा बोध सर्वसामान्यांनाही होत नाही. त्यासाठी खुद्द इंग्लिश शब्दच वापरावा लागतो!

मराठीने इंग्लिश शब्द अंगीकारले, तेव्हा त्यांचे रूप सर्वसाधारणतः तसेच राहिले. उच्चारणात मुळाशी खूपच साम्य राहिले. तत्सम शब्दच आले म्हणाना.... याउलट इतर काही भाषांतून मूळ इंग्लिश शब्दांचे विचित्र उच्चारण होत जणू धिंडवडे निघाले! अगदी राष्ट्रभाषा देखील याला अपवाद नाही. दूरदर्शनवर देखील जॉइंटचे ज्वाइंट होते. स्टेशनचे इस्टेशन होते. हॉस्पिटलचे अस्पताल होते किंवा आयर्नचे आयरन होते. ह्या गोष्टी अगदी जणू पचनी पडून गेल्यासारख्या झाल्यात.

आवडीने बंगाली शिकू पहाणाऱ्या आणि बंगालीचा सराव वाढावा म्हणून समकालीन बंगाली वर्तमानपत्रे, मासिके, वार्षिके यांतून वाचन करू पाहणाऱ्या मला आलेला याबाबतचा अनुभव सुरुवातीला बुचकळ्यात टाकणाराच ठरला. कारण लिपीप्रमाणे वाचून अर्थ समजावून घेताना सुरुवातीला, जवळच ठेवलेल्या शब्दकोशात काही शब्दांचा ठावठिकाणाच लागायचा नाही. एखाद्या लेखात आलेला एखादा शब्द काय असावा हे कळण्यासाठी शब्दकोश उघडावा तर काही सापडत नसे आणि मग मला वाटे की हा शब्दच मुळात बंगाली नसावा आणि बंगाली नसावा म्हणजे कसला असावा? इंग्लिश तर नसेल? मग अक्षरशः धडपडत इंग्लिश शब्दरूप शोधले की अर्थ समजायचा. नंतर मला सवयच होऊन गेली की शब्द समजला नाही की तो इंग्लिश आहे असे समजून चालायचे. इंग्लिश शब्द सापडण्याचा बहुधा ठोकताळा जमून जायचा आणि अर्थही समजून यायचा!

तरीदेखील अजून बंगाली म्हणून वाचायला जायचे आणि मधेच विरूप झालेल्या इंग्लिश शब्दाची ठेच लागली, की वाचनाचा ओघ थांबल्यासारखा वाटतो.



अनुक्रमणिका






एक गोष्ट मात्र खरी की काय काय परीने मूळ इंग्लिश शब्दांचे बंगाली उच्चारणामुळे वाटोळे झाले आहे याचाच विचारही मनोरंजक ठरून जातो. आपणही यातली थोडी गंमत पाहूया -

बंगाली लेखात आलेले ओयार्किंग म्हणजे काय तर वर्किंग, ओयाशिंग म्हणजे वॉशिंग, आयल क्लथ > ऑइल क्लॉथ, सोडा वॉटर > सोडा ओयाटार! ओयाशिंगटन वाचाल तेव्हा वॉशिंग्टन भेटणार!

'व्ह'चे भा होते, पहा लिव्हर > लिभार, ओव्हर ब्रिज > ओभार ब्रिज; परंतु व्हीलरचे म्हणाल तर हुइलार झालेले आढळेल! आणि विनरचे उइनार! ज्वेलर्सचे जूयेलार्स झालेले आढळेल.

'य'च्या अगोदर 'इ' लावलेले दिसेल. पहा युनिट > इयुनिट, युनायटेडचे इयुनायटेड होणार.

ओॲसिसचे अयेसिस होताना दिसेल, तर कनटिनेन्टाल असे एकेक अक्षर जुळवून कॉंटिनेंटलचा बोध करून घ्यावा लागेल. इथे 'न्ट' चे 'न्टा' झालेले दिसते. तो प्रकार कित्येक ठिकाणी आढळतो. उदा - फार्टिलाइजार, फोटोफिचार, स्पेशाल, पन्यान्टासि, आनप्यारालाल, डान्सार, डिलाक्स, प्लीडार, डाफेशनाल, अपारेशन. अशा वेळी वाटतं की, 'अ' चा 'आ' उच्चाराचा तोल सांभाळण्यासाठी होत असेल का? होत असेल म्हणावे तर काही ठिकाणी 'ऑ'चा 'अ' होतो - रॉक > रक. श्रॉफ > श्रफ, ऑडिओ > अडिओ, ऑफिस > अफिस ...

जोडाक्षरांच्या काही गमती पाहण्यासारख्या आहेत. ब्यूटिफुल > बिउटिफूल, परफ्यूम > पारफिउम, कॉम्पॅक्ट > कम्प्यवकट, लिक्विड > लिक्यईड, इन्स्टिट्यूट > इनसि टिउट, हॉस्पिटल > हासपाताल ... इत्यादी.

साधा सरळ मेडिकल हा शब्द मेडिक्याल बनतो. फिनॉमिननचे फेनोमेनन होते. 'द' चे 'द्य' होते! तर पॉवरचे पाओयार!

असे का होते ते कसे विचारणार? आणि कोणाला?

हवालाकांडाबद्दल वाचताना हवालाचे हाओयाला वाचत ढांग टाकावी लागते आणि मग मॅक-डोवेलचे म्याकाडोयेल झाले तरी मुकाट्याने वाचत पुढे जाण्याखेरीज इलाज उरतो का? सांगा ...

■

**शरयू सरिता नगरी फेज -२, ए१/४ सिंहगड रोड, पुणे - ४११ ०३०.**



अनुक्रमणिका

# देवनागरी अक्षरे - पुनर्विचार, पुनर्रचना

नारायण शंकर आपटे

पश्चिम आशियाई, भारतीय आणि इतर लिपींच्या अक्षरांतून विकसलेली देवनागरी अक्षरे जवळजवळ पंधराशे वर्षे जुनी आहेत. काही अक्षरांची कालोचित पुनर्रचना झाली आहे. अशा या विकसनशील अक्षरांचा कळफलकाधारित लेखन-मुद्रण-संदेशवहन यंत्रांच्या आधुनिक युगात पुनर्विचार आणि पुनर्रचना आवश्यक आहे, विशेषतः अक्षरांची संख्या कमी होणे.

देवनागरीची १) स्वराक्षरे स्वोच्चारित स्वतंत्र स्वरध्वनी दर्शवतात, तर २) व्यंजनाक्षरे मुळात अनुच्चारित / अपूर्णोच्चारित असलेले आणि स्वरध्वनीच्या जोडणीमुळेच उच्चारित / पूर्णोच्चारित होणारे व्यंजनध्वनी दर्शवतात. ही गृहीतके मूळ अक्षरांच्या रचनेवरून आलेली असावीत, पण काना किंवा कानाधारित चिन्ह असलेल्या देवनागरी अक्षरांना ही गृहीतके लागू नाहीत असे माझे संशोधन, प्रतिपादन आहे.

ध्वनिविज्ञानाप्रमाणे स्वरध्वनी तसेच व्यंजनध्वनी मुळात अप्रकट/ अनुच्चारित असतात आणि ते कशाच्यातरी साहाय्याने प्रकट / उच्चारित होतात. टाळी वाजायला दोन हात एकमेकांवर आपटावे लागतात. वायू-फूंकवाद्य (हार्मोनियम, बासरी, सनई इ.) आणि वायू - फूंक जोर, तंतुवाद्य (तंबोरा, सतार, सरोद इ.) आणि तंतु / तार छेडन / कंपन, तालवाद्य (मृदंग, पखवाज, तबला-डग्गा इ.) आणि आघात यांच्या जोडीमुळेच वाद्यांत अप्रकट / अनुच्चारित असलेले ध्वनी प्रकट/उच्चारित होतात.

हे जोडीचे तत्त्व पूर्णोच्चार दर्शविणाऱ्या देवनागरी अक्षरांच्या कान्यावाल्या रचनेत वापरण्यात आलेले आहे. प्रत्येक अक्षर हे अनुच्चारित / अपूर्णोच्चारित स्वर तसेच व्यंजन ध्वनीचे चिन्ह आणि त्याच्या उच्चारक सहायक शक्तीचे- काना, कानाधारित, चिन्ह यांची जोडी आहे. हेच त्यांचे अजोड, अद्वितीय वैशिष्ट्य आहे.

'अ' आणि 'क' ते 'ळ' (क्ष, ज्ञ, इत्यादी.) या पूर्णोच्चारी अकारी / अकारान्त स्वर आणि व्यंजन अक्षरांत समान असलेला काना दाखवतो, की 'अ'

या अक्षरात अकारध्वनी विभूती/मुख्य रूपात आहे, तसाच सर्व व्यंजनाक्षरांत तो अंशरूपात आहे. हा समान अकार ध्वनी आणि काना गृहीत धरून बनवली गेलेली आणि व्यंजनाक्षरांना जोडण्यात येणारी बाराखडी चिन्हे दाखवतात, की 'अ' ते 'औ' (अं, अः) ही तथाकथित स्वोच्चारी स्वतंत्र स्वराक्षरे किंवा 'अ'ची स्वरमाला नसून ती 'अ' या स्वराक्षराची दहाखडी / बाराखडी आहेत. उपरोल्लेखित वायू / फूंक - जोराचे तत्त्व पुढे वाढवून सांगता येईल की बोलण्यासाठी उघडलेल्या तोंडाच्या अपूर्ण, वक्र, लंब, पूर्ण गोल इ. आकाराप्रमाणे बाहेर पडणारा श्वासवायूजोर अ स्वरध्वनीचा आणि प्रत्येक व्यंजनध्वनीचा अकारी/आकारी ते औकारी (अं, अःकारी) असा बदलत्या रूपात पूर्णोच्चार करतो. 'न क्षरति इति अक्षरः' ज्या (चिन्हा)चा क्षय होत नाही, ज्या (चिन्हा)त बदल - वाढ होत नाही. ते (चिन्ह) म्हणजेच अक्षर या व्याख्येप्रमाणे देवनागरी अक्षरे 'अक्षर' नाहीत. (रोमन लिपीच्या विविधोच्चारक्षम अपूर्णोच्चारित व्यंजनाक्षरांप्रमाणे आणि पूर्णोच्चारित स्वराक्षरांप्रमाणे देवनागरी अक्षरे मूळ रूपात सर्वत्र वापरली जाऊ शकत नाहीत.)

अख्ख्या किंवा अर्धवट आकारातली ध्वनिचिन्हे आणि अख्ख्या किंवा तुकड्यांच्या आकारातली उच्चारक काना/कानाधारित चिन्हे एकमेकांशेजारी ठेवून, एकमेकांना जोडून किंवा एकमेकांत मध्यावर किंवा वरखाली गुंतवून निरनिराळ्या प्रकारांनी केलेली देवनागरी अक्षरांची रचना त्यांचे अजोड-अद्वितीय वैशिष्ट्य ठरण्याबरोबरच त्यांचा अजोड अद्वितीय दोषपण ठरली आहे. (प्रचलित देवनागरी अक्षरांचा तक्ता पहा)

त्यामुळे मजकूर लिहिण्यासाठी देवनागरी ४८ अक्षरे, बाराखडी, चिन्हे, तोड आणि जोड व्यंजनाक्षरे, जोडाक्षरे बनवण्यासाठी व्यंजनाक्षरांची अतिरिक्त रूपे / चिन्हे मिळून २५०/३०० किंवा अधिक अक्षर चिन्हरूपे वापरावी लागत आहेत. विचित्र जोडाक्षरे, अपूर्णोच्चारित ध्वनिचिन्हे पूर्णोच्चारित ध्वनिचिन्हाच्या कान्याला जोडून लिहिणे कठीण असल्याने लिहिताना वर्णांचा क्रम उलटा करण्याचे प्रकार होतात. उदा. ब्राह्मण / ब्रह्म ऐवजी ब्राम्हण / ब्रम्ह, चिह्न ऐवजी चिन्ह, बुद्ध / शुध्द ऐवजी बुध्द / शुध्द इत्यादी. ऋ / लृ आधींच्या अपूर्णोच्चारित व्यंजन ध्वनी चिन्हाला जोडून लिहिताना ऋ च्या ऐवजी 'केवळ' 'ृ' चिह्न वापरले जाते (वृश्चिक), तर लृ मूळ रूपात वापरला जातो (क्लृप्ती). ही विसंगती आहे. मूळ व्यंजनाक्षर आणि त्याचेच हकारयुक्त व्यंजनाक्षर यात विसंवाद आहे. उदा. क -

(क् + ह =) ख, ग - (ग् + ह =) घ, च - (च् + ह =) छ, ज - (ज् + ह =) झ, ड - (ड + ह =) ढ इत्यादी.

प्रचलित देवनागरी अक्षरांचे वरील दोष, विसंगती, विसंवाद, वर्णविपर्यास आणि त्यामुळे उद्भवलेली अक्षरांची मोठी संख्या टाळून लेखन, मुद्रण, संदेशवहन कमी अक्षरचिन्हांनी, उच्चारानुक्रमी, सोपे, सुटसुटीत करण्यासाठी प्रचलित

अ आ इ ई उ ऊ ए ऐ ओ औ

क ख ग घ ङ च छ ज झ ञ

ट ठ ड ढ ण त थ द ध न

प फ ब भ म य र ल व

श ष स ह ळ ऋ ऌ

क्ष ज्ञ

• अनुस्वार अनुनासिक

: विसर्ग

आघात

• तळबिंदू नुक्ता



अनुक्रमणिका

देवनागरी अक्षरांची ओळख विसरवणारी सुधारणा नव्हे; तर (मुख्य अक्षरांची) ओळख आणि वैशिष्ट्य ठेवणारी पुनर्रचना आवश्यक आहे. म्हणून प्रचलित देवनागरी मुख्य अक्षरांतील पूर्णाकारी ध्वनिचिन्हे तशीच, तत्सम करून अर्धवट आकाराची ध्वनिचिन्हे तद्भव पूर्णाकारी करून, हकारयुक्त व्यंजनध्वनिचिन्हे मूळ ध्वनिचिन्हांशी संवादी पूर्णकारी करून आणि काना/कानाधारित चिन्हे एकसंध, स्वतंत्र, पूर्णाकारी करून ध्वनिचिन्हांच्या पुढे ठेवून चिन्हजोडीच्या रूपात मी प्रचलित देवनागरी अक्षरांची पुढीलप्रमाणे पुनर्रचना सुचवत आहे.

सोबतच्या तौलनिक तक्त्यात प्रचलित देवनागरी अक्षरे (त्यांची ध्वनिचिन्हे पातळ रेघेने तर कानाचिन्ह ठळक जाड रेघेने), बाराखडी चिन्हे आणि त्यांची पुनर्रचित जोडीरूपे दाखवली आहेत.

एकंदर ध्वनिचिन्हे ३५, तर उच्चारक काना/कानाधारित चिन्हे १३ = ४८ आहेत. सध्याप्रमाणेच पूर्णोच्चार दाखवण्यासाठी ध्वनिचिन्हाबरोबर आवश्यक ते उच्चारक काना/कानाधारित चिन्ह वापरायचे आहे तर अपूर्णोच्चार दाखवण्यासाठी एक वा अधिक व्यंजनध्वनी चिन्ह.

एकाहून अधिक व्यंजनध्वनींचा संयुक्त / जोड (जोडाक्षर) उच्चार दाखवण्यासाठी आधीच्या अक्षरावर किंवा शेवटच्या पूर्णोच्चारी अक्षरावर आघात द्यावा लागतो. त्यासाठी आघाताचे शीर्षचिन्ह सुचवत आहे.

देवनागरी अक्षरांचे प्रमाण उच्चार संस्कृत भाषेतल्याप्रमाणे असतात. प्राकृत भाषेत त्यातील ध्वनिचिन्हांचे आणि उच्चारक चिन्हांचे वेगळ्या धाटणीतील उच्चार दाखवण्यासाठी आधी द्यावयाचे डावीकडील ठळक तळबिंदू-नुक्ता चिन्ह सुचवत आहे.

विसर्गचिन्हाचे काम प्रचलित कोलन चिन्हाने होईल. एकंदर ४९ चिन्हांत वारंवार वापरल्या जाणाऱ्या जोडाक्षरांच्या ध्वनिचिन्हांची, ॐची भर घालता येईल.

मी सुचवत असलेली पुनर्रचित देवनागरी चिन्हजोडी अक्षरे मराठी, हिंदीबरोबरच इतर प्राकृत-प्रादेशिक भाषांसाठी सोईची आहेत,

तरी प्रचलित अक्षरांच्या ऐवजी ती वापरण्याचा विचार व्हावा.

■

**८/११, समर्थनगर, चुनाभट्टी, मुंबई, ४०० ०२२.**



अनुक्रमणिका

# श्रीकेक्षींची भाषाहितैकदृष्टी

कल्याण काळे

विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात आपल्या महाराष्ट्रात अनेक विषयांच्या अनुषंगाने मोठ्या प्रमाणावर विचारमंथन झाले. त्यामध्ये भाषाविषयक विचारप्रदर्शनही फार मोठ्या प्रमाणावर झाले. त्यातील प्रमुख विचारवंत म्हणून वि. का. राजवाडे, श्रीधर व्यंकटेश केतकर, विठ्ठल रामजी शिंदे, राजारामशास्त्री भागवत, श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, स्वा. सावरकर, माधवराव पटवर्धन, कृ. पां. कुळकर्णी, श्री. के. क्षीरसागर, श्री. ना. बनहट्टी, ग. त्र्यं. माडखोलकर, वा. म. जोशी इ. नावे सहज डोळ्यांसमोर येतात.

त्यामध्ये श्री. के. क्षीरसागरांचे वैशिष्ट्य हे, की त्यांनी विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात वयाच्या ऐन उमेदीत आपल्या भाषाविषयक लेखनाची सुरुवात करून उत्तरार्धातही आपल्या आयुष्याच्या अखेरपर्यंत त्यात सातत्य राखून आपल्या विचाराचा नेटाने पाठपुरावा केला. ते रूढार्थाने भाषावैज्ञानिक नव्हते; पण मराठी भाषेच्या प्रेमापोटी, तिच्या स्वास्थ्यासाठी, सौंदर्यासाठी आणि विकासासाठी मोठ्या पोटतिडकीने धर्मप्रचारकाच्या निष्ठेने त्यांनी लेखन केले. जागोजागी आपली मते मांडली.

त्यांच्या भाषाविषयक लेखांचा संग्रह 'मराठी भाषा : वाढ आणि बिघाड' या शीर्षकाने राज्य मराठी विकास संस्थेने नुकताच म्हणजे फेब्रुवारी २००० मध्ये प्रसिद्ध केला आहे. या ग्रंथात त्यांचे भाषाविषयक चौतीस लेख समाविष्ट आहेत. त्यामध्ये त्यांचे बडोदे येथील चौदाव्या वाङ्मय परिषदेतील अध्यक्षीय भाषण (फेब्रु. १९५१), सावरकरांच्या 'भाषाशुद्धी' या ग्रंथाच्या तिसऱ्या आवृत्तीला त्यांनी लिहिलेली प्रस्तावना (१९७७) यांचाही समावेश आहे. या लेखांमध्ये त्यांचे भाषाशुद्धीची चळवळ, स्वातंत्र्यकाळात महाराष्ट्र शासनातर्फे झालेले परिभाषानिर्मितीचे कार्य, शिक्षणाच्या क्षेत्रातील त्रिभाषासूत्र आणि अभ्यासक्रमातील मराठी आणि इतर भाषांचे स्थान, स्वतंत्र भारताची राजभाषा, सानेगुरुजींची आंतरभारतीची चळवळ, वृत्तपत्रे आणि मराठीचे प्रदूषण,



अनुक्रमणिका

शुद्धलेखन आणि लिपिसुधारणा या विषयांवरचे विचार प्रकट झाले आहेत.

त्यापैकी सावरकर-पटवर्धन प्रणीत भाषाशुद्धीची चळवळ हा त्यांच्या अनेक लेखांचा विषय असून त्यातून त्यांनी या चळवळीला कडाडून विरोध केला आहे. खरे पाहता, या तिघांनाही परकीय भाषांच्या संपर्काने मराठी भाषेच्या प्रकृतीत झालेल्या बिघाडाची चिंता आहे आणि तिच्याविषयीच्या आत्मीयतेमुळेच हे तिघेही लेखनास प्रवृत्त झाले आहेत, पण तिघांच्या विचारसरणीत काही भिन्नता आढळते.

या तिघांच्या - या संबंधातल्या लेखनाच्या प्रेरणा वेगवेगळ्या होत्या. सावरकर हे हिंदुत्वाच्या आणि स्वराष्ट्राच्या अभिमानातून भाषाशुद्धीच्या चळवळीला प्रवृत्त झाले होते. माधवराव पटवर्धन केवळ मराठी विषयीच्या अभिमानातून या चळवळीकडे पाहात होते आणि क्षीरसागर मराठीच्या सौंदर्याच्या रक्षणासाठी सज्ज झाले होते.

सावरकर आणि पटवर्धन यांच्या प्रेरणा वेगवेगळया असल्या तरी त्यांचे भाषाशुद्धीचे कार्य एकाच स्वरूपाचे होते. पारतंत्र्याच्या काळात मुस्लिम, इंग्रज यांच्या सत्तांनी आपापल्या भाषा येथील शासकीय व्यवहारावर लादल्या. परिणामतः फारसी आणि इंग्रजी या भाषांतून अनेक शब्द एतद्देशीय भाषांत घुसले. मराठीतही ते घुसले. हे शब्द म्हणजे आपल्या पारतंत्र्याच्या काळातील खुणा असून त्यांना हुसकावून लावून आपल्या भाषेतील मूळचे शब्द किंवा ते मिळत नसतील तर तदर्थक नवीन शब्द त्यांच्या जागी वापरणे हे सावरकरांच्या चळवळीचे सूत्र होते. माधवराव पटवर्धनांना या परकीय शब्दांनी मूळच्या स्वाभाविक मराठी शब्दांना हुसकावून लावल्यामुळे आपण त्या शब्दांना मुकलो असे वाटे. त्यामुळे त्या मूळच्या शब्दांची स्थापना करणे हे त्यांना कर्तव्य वाटे. नवीन संकल्पनांसाठी मराठीची क्षमता असूनही या परकीय शब्दांच्या उपस्थितीमुळे तिला नवीन शब्द घडवता आले नाहीत. तेव्हा ते आता घडवून तिची निर्मितीक्षमता विकसित करणे हेही त्यांना आवश्यक वाटे. तात्पर्य हे, की या दोघांनीही परकीय शब्दांचे उच्चाटन आणि त्याजागी स्वकीय शब्दांची प्रतिष्ठापना हाच समान कार्यक्रम स्वीकारला. फरक एवढाच, की नवीन शब्द बनवताना सावरकर संस्कृत शब्दसिद्धीचा भरपूर वापर करीत, माधवराव शक्यतो जुन्या मराठीतील पर्यायांचा शोध घेत, पण त्यांना संस्कृत वर्ज्य नव्हते.

क्षीरसागरांचा या प्रकारच्या भाषाशुद्धीला विरोध असल्याचे कारण हे, की

त्यांच्या मते भाषाशुद्धीचा हा प्रकार स्वरूपतः शब्दशुद्धीचा प्रकार आहे आणि ही शब्दशुद्धीदेखील आततायी स्वरूपाची आहे. सर्वांना परिचित असलेले शब्द केवळ ते परक्या भाषेतून आले आहेत म्हणून हुसकून लावून त्यांच्या जागी बोजड आणि अपरिचित शब्द कृत्रिमरीत्या बनवून घुसवण्याने भाषाशुद्धी तर होत नाहीच; पण भाषा विद्रूप मात्र बनते. वकीलसाठी विधिज्ञ, वकिलीसाठी विधिज्ञकी, लेक्चररसाठी प्रवारक, रीडरसाठी प्रपाठक, प्रोफेसरसाठी प्राध्यापक, रजिस्टरसाठी पटांकण, रजिस्टर्डसाठी पटांकित, मनिऑर्डरसाठी धनटपाल असे शब्द सावरकरांनी सुचविले आहेत. माधवराव पटवर्धनांनी जिराईतसाठी पाऊसपिकी भूमी, ताजा कलमसाठी पुरवणी लेख, दमेकरीसाठी श्वासरोगी, तावदानसाठी काचफळी, दौतसाठी मशीधानी, पैलूदारसाठी शाणोल्लीढ असे शब्द सुचविले आहेत. वरील सर्व शब्द मराठीत चांगले रुळलेले आहेत. ते मराठीत नैसर्गिकरीत्या आलेले आहेत. ते काढून त्यांच्या जागी बळेच घडवलेले शब्द वापरायला सांगणे हा आततायीपणाच आहे.

हे शब्द मूळ परकीय शब्दघटकांचे भाषांतर करून बनवले जातात. कित्येक वेळा त्यातून अर्थबोध होतोच असे नाही. प्रवाचक, प्रपाठक, प्राध्यापक या तीन शब्दांनी या तीन पदांच्या कार्यकक्षेतील कोणता भेद स्पष्ट होतो हे कळत नाही. दुसरी एक प्रवृत्ती अशी की हे भाषांतर करताना मूळ शब्दाशी ध्वनिसाम्यही साधण्याचा प्रयत्न केला जातो. कमिटीसाठी समिती, ड्राउट प्रोनसाठी अवर्षणप्रवण या प्रकारचे शब्द बनवणे म्हणजे क्षीरसागरांना पोरकट अट्टहास वाटतो. या शब्दसिद्धीमध्ये संस्कृतमधील उपसर्गाचा अतिरेकी वापर केलेला असतो. त्यामुळेही त्या शब्दांची अर्थवहनक्षमताच नाहीशी होते. अभियंता-उपअभियंता, आवेदन-निवेदन-प्रतिवेदन, अधीक्षक-पर्यवेक्षक, निदेशक-समादेशक, इ. शासकीय परिभाषेतील शब्दांचे अर्थभेद नेमकेपणाने सांगता येतील का? तिसरी एक प्रवृत्ती की हे शब्द बनवताना हिंदी, बंगाली या भाषांतील संस्कृत परिभाषेचाही उपयोग केला जातो. ते शब्द केवळ संस्कृतमधील आहेत एवढे समर्थन पुरेसे नाही. त्या त्या शब्दांचे त्या त्या भाषेतील संकेत वेगळे वेगळे असतात. 'साक्षर' या संस्कृत शब्दाचा गुजरातीमध्ये 'साहित्यिक'असा अर्थ होतो; तर मराठीत 'अक्षर ओळख असलेला' असा होतो, 'जातीय' या शब्दाचा मराठीतील अर्थ 'जातपात' विषयक असा होतो. तेलुगूमध्ये तो 'राष्ट्रीय' असा होतो; तर गुजरातीमध्ये तो 'लैंगिक' असा होतो. असे करण्यामागे सर्व भारतीय

भाषांसाठी समान परिभाषा निर्माण करण्याचा उद्देश असतो; पण प्रत्येक भाषेने आपली संकेतव्यवस्था कशासाठी बदलायची, असा क्षीरसागरांचा यावर प्रश्न आहे. या सर्व खटपटीतून भाषेत नवे शब्द कृत्रिमरीत्या आणले जातात. त्यामुळे भाषेतील नैसर्गिकता नष्ट होते. भाषा विद्रूप बनते असे क्षीरसागरांचे मत आहे. सौंदर्यवादी क्षीरसागरांना भाषेचे हे विद्रूपीकरण कधीही पसंत पडणार नव्हते. माधवराव पटवर्धन हे देखील सौंदर्यवादी खरे; पण त्यांचे याबाबतीतले उलट म्हणणे असे की आधी स्वाभिमान पाहणे महत्त्वाचे त्यानंतर सौंदर्यनिर्मितीचा प्रश्न येतो. हे उत्तर अर्थातच कोणालाच मान्य होणारे नाही.

वास्तविक पाहता दोन भाषांचा संपर्क होतो तेव्हा शब्दांचे आदान-प्रदान होणे ही स्वाभाविक गोष्ट आहे; परक्या भाषेतून शब्द आपोआप येत असतात, ते मुद्दाम आणावे लागत नाहीत. सावरकर-पटवर्धन मात्र शब्द भाषेत आणून सोडत आहेत. त्या पद्धतीने कुठलाच शब्द भाषेत रूढ होत नसतो. केवळ संस्कृत कोशात आहेत म्हणून वाटेल ते शब्द मराठीवर लादता येणार नाहीत. त्यामुळे लिहिण्याची भाषा पंडिती व अस्वाभाविक होत जाते आणि ती व्यवहारातल्या भाषेपेक्षा वेगळी होत जाते. व्यवहाराच्या अकृत्रिम ओघात येणारे शब्द पांडित्याची कदर न करता शक्यतो मराठी पेहेराव घेत घेत येत असतात आणि भाषेच्या व्यवस्थेत स्वतःचे योग्य स्थान ठरवत येत असतात. त्यामुळे ते आगंतुक वाटत नाहीत. कृत्रिमरीत्या आणलेले शब्द उपरे वाटत असतात.

सावरकर - पटवर्धनांची भाषाशुद्धीची चळवळ ही केवळ शब्दपातळीपुरतीच मर्यादित आहे; पण भाषेचे प्रदूषण हे फक्त शब्दपातळीवरच थांबत नसते. ते ध्वनी, शब्द, शब्दबंध आणि वाक्य या सर्वच पातळ्यांवर चालू असते. सावरकर - पटवर्धनांच्या नजरेतून ही गोष्ट सुटली आहे, हे क्षीरसागरांनी आवर्जून सांगितले आहे.

इतिहासकाळात फारसीचे अनुकरण मराठीने केले. इंग्रजांच्या काळात इंग्रजीचे केले. फारसीच्या आक्रमणाचा बीमोड मागच्या शतकातील लेखकांच्या पिढीने यशस्वीपणे केला. इंग्रजीच्या आक्रमणाचा बीमोड व्हावा तसा झाला नाही. राजवाड्यांच्या काळात मराठीला जेवढे भय होते, त्याहीपेक्षा अधिक भय स्वातंत्र्यकाळात जाणवू लागले आहे. सभोवताली इंग्रजीचे अफाट कौतुक चालले असता भाषेत तिचे वर्चस्व उतरणारच. असे असतानाही मराठी वाङ्मयामध्ये तेवढे ते जाणवत नाही. प्रसारमाध्यमातून ते बरेच जाणवते. वर्तमानपत्रांना

इंग्रजीतून बातम्या मिळतात. तिचे घाईघाईने भाषांतर करणे भागच असते. त्यातून प्रदूषित मराठी बाहेर पडते. दुकानांवर इंग्रजी पाट्या का येतात? आपल्या सर्व सार्वजनिक जीवनात इंग्रजीला महत्त्व मिळत आहे. त्यामुळे दुकानांवर इंग्रजी दिसणारच. इंग्रजीचे हे महत्त्व कमी होईल तेव्हाच इंग्रजी भाषेचा प्रभाव कमी होईल.

परकीयांच्या संस्कृतीची महत्त्वाची अंगे स्वीकारून आपल्या संस्कृतीची अवहेलना करणे आणि केवळ भाषाशुद्धीवर जोर म्हणजे राष्ट्रीयदृष्ट्या भाषाशुद्धी नव्हे. गळ्यात नेकटाय बांधायचा आणि त्याला गळपट्टी म्हणा म्हणून आग्रह धरायचा हे योग्य नव्हे, असे क्षीरसागर म्हणतात. सावरकरांना प्रत्युत्तर देताना ते म्हणतात, की प्रतिकारास पोषक असल्यास मांसाहारापासून ते वर्णविध्वंसनापर्यंत कोणत्याही परकीय गोष्टींचा बेधडक पुरस्कार करण्यास ज्यांनी कमी केलेले नाही, अशी धिटाई दाखवणाऱ्या वीरांनी भाषेच्या बाबतीत मात्र एखाद्या आजीबाईप्रमाणे सोवळे सांभाळणे हास्यास्पद होय.

तेव्हा भाषाशुद्धीची चळवळ एकांगी आहे, आततायीपणाची आहे. तिच्यामुळे मराठी भाषा विद्रूप होत चालली आहे. तेव्हा तिच्याविरुद्धच मोहीम उघडण्याची गरज निर्माण झाली आहे. भाषाशुद्धीच्या संदर्भात तारतम्य, उपयुक्तता व भाषासौष्ठव या चिपळूणकरप्रणीत त्रिसूत्रीसच सर्वांनी अग्रस्थान दिले पाहिजे, असे क्षीरसागरांचे मत आहे.

क्षीरसागरांचे भाषाशुद्धीच्या संदर्भातले हे विचार सर्वांना मान्य होण्यासारखेच आहेत. ते त्यांनी अतिशय प्रभावीपणे मांडले आहेत, परखडपणे मांडलेले आहेत. त्यांच्या वक्तृत्वपूर्ण शैलीचा विचार करण्यास इथे अवकाश नाही. आपल्या प्रतिपादनाच्या ओघात त्यांनी जी उदाहरणे दिली आहेत, त्यांपैकी काही त्यांच्या काळात समर्पक आणि आवश्यक असली तरी आजच्या बदलत्या परिस्थितीत ती गतार्थ झाली आहेत आणि काही त्यांच्या प्रतिपादनाशी विसंगतही ठरत आहेत, पण हा तपशिलाचा भाग झाला. त्यामुळे त्यांच्या वैचारिक भूमिकेला झळ पोचत नाही.

भाषाशुद्धीप्रमाणेच शिक्षणक्षेत्रातील भाषानियोजन हाही त्यांच्या जिव्हाळ्याचा प्रश्न आहे. या संदर्भात शासनाने ज्या त्रिभाषासूत्राचा पुरस्कार केला आहे ते त्यांना मान्य नाही. या त्रिभाषासूत्राने संस्कृतच्या अध्ययनावर जी गदा आणली आहे ती त्यांना मान्य नाही. भारतातील सर्वच भाषा या संस्कृतच्या

पायावर जोपासल्या गेल्या आहेत. आपल्या संस्कृतीचे मूळ संस्कृताध्ययनात आहे. या संस्कृतच्याच आधाराने एकोणिसाव्या शतकातील लेखकांनी फारसीचा हल्ला परतवून लावला. तेव्हा संस्कृतविरहित अभ्यासक्रम म्हणजे रामावाचून रामायण आहे असे त्यांचे मत आहे, तेव्हा शिक्षणक्रमात तिला महत्त्वाचे स्थान असलेच पाहिजे. आजच्या पिढीचे मराठी विद्रूप बनले आहे. त्याला कारण संस्कृतचे अज्ञान हेच होय, असे त्यांनी सांगितले आहे. काही प्रमाणात हिंदीचे महत्त्व त्यांनी स्वीकारले आहे. ती राजभाषा नसली तरी लोकव्यवहाराची भाषा आहे असे त्यांचे मत आहे, पण त्यामुळे अभ्यासक्रमात तिला अवास्तव महत्त्व देणे त्यांना मान्य नाही. हिंदीची उर्दूमिश्रित आणि संस्कृतमिश्रित दोन्हीही रूपे त्यांना मान्य नाहीत. सर्वसामान्यांच्या व्यवहारातील जी हिंदी तीच भारताची लोकव्यवहाराची भाषा आहे, असे त्यांना वाटते आणि ती शिकण्यासाठी एक-दोन वर्षांचा प्रमाणपत्र पातळीवरचा अभ्यासक्रम पुरेसा आहे, असे त्यांचे मत होते. शालेय शिक्षणातून तर हिंदीची हकालपट्टीच करावी असे त्यांचे मत आहे. इंग्रजांच्या काळात इंग्रजीचे महत्त्व वाढले. त्याची स्वातंत्र्यकाळात आता आवश्यकता नाही. आपण १५-१६ वर्षे इंग्रजीच्या शिक्षणात घालवतो त्याचा त्या प्रमाणात फायदा काहीच होत नाही. इतकी वर्षे इंग्रजी शिकूनही बहुसंख्य पदवीधरांना इंग्रजी येतच नाही. इंग्रजी शिकवण्याच्या ज्या पध्दती अध्यापन महाविद्यालयात शिकविल्या जातात त्या हास्यास्पद आहेत. भारतातील बहुसंख्यांना इंग्रजीच्या वाङ्मयाच्या अभ्यासाची गरज नाही. तेव्हा इंग्रजीच्या अभ्यासक्रमात निरनिराळे वाङ्मयप्रकार, वाङ्मयाचे इतिहास शिकवण्याची गरज नाही. ग्रांथिक इंग्रजी समजण्यापुरतं इंग्रजी आलं पाहिजे. इंग्रजी माध्यमातून इंग्रजी शिकणं योग्य नव्हे. 'इंग्रजी शिका; पण इंग्रजीतून शिकू नका' असे सूत्र त्यांनी या संदर्भात सांगितले आहे. इंग्रजी ही सर्व राष्ट्राला जोडणारी भाषा आहे हा त्यांचा अपप्रचार आहे. कारण तीच दक्षिण भारत आणि उत्तर भारत यांच्यामधील भांडणाचे मूळ आहे. तसेच इंग्रजीतील सर्वच ज्ञान श्रेष्ठ असते हे देखील खरे नाही. इंग्रजांनी शिकवलेला इतिहासही आपण टाकून दिला पाहिजे. कायदेमंडळे, महाविद्यालयीन अध्यापनाचे माध्यम इ. क्षेत्रांतून इंग्रजीचे उच्चाटन झालेच पाहिजे. सध्या मात्र इंग्रजी लिहिणे, वाचणे, बोलणे, अनेक विषयांचा इंग्रजीतून अभ्यास करणे व त्या अभ्यासाचे इंग्रजीतूनच आविष्करण करणे यालाच आपण शिक्षण समजत आहोत. या सर्व चक्रव्यूहात श्रम, खरे ज्ञान आणि इंग्रजीचे ज्ञान या तिन्हींचे प्रमाण काय हे आता ठरविण्याची

वेळ आली आहे. तेव्हा अनेकांची मोलाची वर्षे वाया घालवायची नसतील तर इंग्रजीच्या अभ्यासक्रमातील गैरवाजवी स्थानाचा पुनर्विचार करावाच लागेल असा इशारा त्यांनी दिला आहे. इंग्रजी केवळ भाषा म्हणून शिकावी आणि शिकविण्यात यावी. मराठीच्या अभ्यासालाही त्याचा उपयोग होईल. हीच गोष्ट फारसीची - फारसी ही भाषा म्हणून शिकावी. मध्ययुगीन इतिहासातील कागदपत्रे वाचण्यासाठी तिचा उपयोग होईल. म्हणून प्रत्येक शाळेत एक पारसनवीस म्हणजे फारसी पंडित असावा, अशी त्यांची सूचना आहे. अन्य भारतीय भाषांच्या अभ्यासाच्या संदर्भात त्यांनी 'आंतरभारती' चा विचार केला आहे. सानेगुरुजींच्या 'आंतरभारती' या शब्दाला त्यांचा विरोध असला तरी आंतरभारतीच्या कल्पनेला त्यांचा विरोध नाही. आपण मराठी माणसे फार एकलकोंडे असून आपल्या इतर भारतीय भाषांचे साहित्य, साहित्यिक, वाङ्मयेतिहास यांबद्दल आपल्याला काही माहिती नसते. ही परिस्थिती बदलली पाहिजे. भारतातल्या सर्व भाषांमध्ये सामंजस्य राहिले पाहिजे. परस्परांबद्दल आदरभाव वाढला पाहिजे असे त्यांचे मत आहे.

मराठीच्या बाबतीत लिपिसुधारणेच्या प्रयत्नांबद्दल क्षीरसागर नाखूष आहेत. आपली पारंपरिक बाळबोध लिपी ही शास्त्रशुद्ध आहे; पण आज जुळाऱ्यांसाठी, टंकयंत्राच्या सोईसाठी आपल्याला तिची अडचण भासू लागली आहे. जोडाक्षरे तोडून पाय मोडकी करणे, त्यांची आगगाडीसारखी रांग लावणे इ. प्रकार अनिष्ट असून त्याने आपल्या लिपीचे सौंदर्य नष्ट होत आहे. आपण टंकयंत्राच्या सोईचा विचार करतो. जुळाऱ्यांच्या सोईचा विचार करतो; पण वाचणाऱ्यांच्या डोळ्यांना काय सुखद होईल याचा विचार करत नाही अशी त्यांची तक्रार आहे. मराठीच्या शुद्धलेखन चळवळीच्या संदर्भात ते महामंडळाने मान्य केलेले नियम स्वीकारतात आणि पंडितांनी आता जुन्या सूचना आणि शंका उगाळण्याचे बंद करावे, असा इशारा देतात. नव्या चुकांकडे लक्ष पुरवील तेच नवे शुद्धलेखन मानावे अशीही त्यांनी सूचना केली आहे.

श्रीकेक्षींनी एखाद्या मिशनऱ्याप्रमाणे आपली मते मोठ्या आग्रहाने मांडली आहेत. ती मांडताना त्यांची भाषा वक्तृत्वपूर्ण होते. अनेक उदाहरणे देऊन त्यांनी आपले मुद्दे वाचकांना पटवून दिले आहेत. त्यांचे सगळेच मुद्दे आजच्या परिस्थितीत मान्य होतील असे नाही. त्यांनी ज्या शब्दांवर आक्षेप घेतले आहेत, त्यांपैकी बरेचसे शब्द आज रुळले आहेत. भाषेत ही प्रक्रिया चालूच राहणार आहे, पण

श्रीकेक्षींची विचारसरणी स्थूलमानाने पटायला काहीच हरकत नाही.

(श्री. के. क्षीरसागर यांच्या जन्मशताब्दीनिमित्ताने ९-९-२००१ रोजी आयोजित केलेल्या चर्चासत्रामध्ये वाचलेला निबंध - संपादक)

■

**प्लॉट नं. ९२, दीपक सहनिवास, तुळशीबागवाले वसाहत, पुणे - ४११ ००९.**

कोणत्याही देशात मुलाला जर काही शिकविणे अवश्य असले, तर ती त्याची जन्मभाषा होय. ती भाषा म्हणजे तो व त्याचे पूर्वज, वर्तमान व भूत, तो व त्याचे शेजारी, तो व त्याचा समाज यांचे एकत्व ठरविणारे नाते असते. महाराष्ट्रातील प्रत्येक मुलास महाराष्ट्राची भाषा शिकावयाची नाही तर काय शिकवावयाचे? ... आमच्या जन्मभाषा म्हणजे आमच्या पूर्वजांच्या अंतरात्म्यांचे निःश्वास आहेत. त्यांचे विचार, त्यांचे विकार, त्यांचे राग, त्यांचे लोभ, त्यांच्या महत्त्वाकांक्षा, त्यांच्या आवडीनिवडी, त्यांच्या प्रेमाचे धागे, त्यांच्या कल्पनांचे तरंग, त्यांच्या बुद्धीचे वैभव, त्यांच्या प्रतिभेचे तेज, त्यांच्या मनाच्या भराऱ्या, त्यांच्या हृदयांच्या उड्या, त्यांच्या स्नायूतील स्फुरण, त्यांच्या मनगटातील जोर, त्यांच्या अभिमानाचे सार, त्यांच्या भक्तीचे भाव, जे जे काही त्यांचे होते, त्या सर्वांनी त्या खचलेल्या आहेत. आम्हांस आमच्या पूर्वजांशी बांधून टाकणारे ज्ञानरज्जू हे! हे तोडण्याचा प्रयत्न जो शिक्षणक्रम करतो तो आमचा घात करणारा होय. शेक्सपिअरची, मिल्टनची, वेलिंग्टनची, नेल्सनची म्हणून जसा इंग्रजी भाषेचा इंग्रजास अभिमान आणि तिच्या अध्ययनाची गोडी, तशीच ज्ञानेश्वरांची, एकनाथांची, तुकारामांची, पंडितांची, पंतांची, शिवाजीची, रावबाजीची, नाना फडणविसांची, महादजी शिंद्यांची जी मराठी भाषा तिचा आम्हां महाराष्ट्रीयांस अभिमान वाटला पाहिजे.

■

**वा. ब. पटवर्धन, 'शिक्षण, शिक्षक व अभ्यासक्रम'**
(१९०६, **संपादित आवृत्ती** २०००) **पृ.** ३७-३८

# "सकाळ" वृत्तपत्राची नीटस ओळख

विजया चौधरी

(लेखिका - स्वाती सुहास कर्वे. पुस्तक - सकाळ वृत्तपत्र आणि वृत्तपत्रसमूह. प्रकाशक - राज्य मराठी विकास संस्था मुंबई. जानेवारी २००१, पृष्ठे १३८. मूल्य ६० रुपये)

राज्य मराठी विकास संस्थेने प्रसिद्ध केलेल्या 'अर्वाचीन महाराष्ट्राची जडणघडण' या पुस्तकमालेतील 'सकाळ वृत्तपत्र आणि वृत्तपत्रसमूह' हे सातवे पुस्तक आहे. आजच्या महाराष्ट्रावर प्रभाव टाकणाऱ्या व्यक्ती, संस्था आणि विचारप्रवाह यांचा परिचय तरुण पिढीला करून देणे हा या मालिकेचा हेतू सुरवातीलाच संस्थेच्या संचालकांनी स्पष्ट केला आहे. स्वाती सुहास कर्वे यांनी राज्य मराठी विकास संस्थेच्या या उद्दिष्टांशी इमान राखत अत्यंत परिश्रमपूर्वक हे पुस्तक सिद्ध केले आहे. अर्वाचीन महाराष्ट्राच्या जडणघडणीत 'सकाळ' चे स्थान वादातीत आहे. विशिष्ट ध्येयाने प्रेरित होऊन डॉ. ना. भि. परुळेकरांनी १ जानेवारी, १९३२ ला 'सकाळ' हे दैनिक पुण्यात सुरू केले. या दैनिकाची एक 'वृत्तपत्र' इथपासून ते एक 'वृत्तपत्रसमूह' व त्याही पुढे जाऊन एक 'समाजाभिमुख संस्था' इथपर्यंतची वाटचाल स्वाती कर्वे यांनी यथार्थतेने टिपली आहे. या वृत्तपत्राने आपल्या ६८ वर्षांच्या प्रवासात समाजावर उमटवलेला ठसा आणि पर्यायाने समाजाचे केलेले सांस्कृतिक व वैचारिक प्रबोधन यांचा वेध स्वाती कर्वे यांनी आपल्या अभ्यासू व विवेचक दृष्टीने घेतला आहे. परुळेकरांच्या 'सर्वांगीण वृत्त' या संकल्पनेपासून ते त्यांच्या व्यवस्थापन व वितरण कौशल्यांपर्यंत सर्व अंगांचा, बाजूंचा त्या विचार करताना दिसतात. एखाद्या वृत्तपत्राचा अशा पद्धतीने केलेला अभ्यास हा मराठीतील पहिलाच प्रयत्न असावा. स्वाती कर्वे यांनी वस्तुनिष्ठ पद्धतीने तो वाचकांसमोर मांडल्यामुळे या पुस्तकाला सामाजिक तसेच ऐतिहासिक मूल्यही प्राप्त झाले आहे. ■

**इ-५०३, गार्डन व्ह्यू, पर्वतीनगर, सिंहगड रोड, पुणे - ४११ ०३०.**

# एका ज्ञानतपस्वीने घेतलेला निरोप

*(चिरस्मृत प्रा. दिनेश द. माहुलकर यांच्या 'वृद्धिः' या पुस्तकाच्या प्रकाशन समारंभाच्या प्रसंगी त्यांनी केलेल्या भाषणातील काही निवडक भाग येथे देत आहोत. या समारंभानंतर थोड्याच दिवसांत त्यांनी जगाचा निरोप घेतला.) (प्रा. माहुलकर आणि त्यांचा ग्रंथ यांचा परिचय पत्रिकेच्या वाचकांना या अगोदर झालाच आहे : अनुक्रमे पावसाळा २००० अंकातील मृणालिनी कामत यांचा आणि दिवाळी २००० अंकातील म. अ. मेहेंदळे यांचा लेख. - संपादक)*

माझ्याकडे येणाऱ्या मित्रमंडळीत भाषाशास्त्र जाणण्याचे औत्सुक्य पाहून मराठी भाषेत 'भाषाशास्त्र' यावर लिहावे असे मनात आले. त्यांच्या आग्रहाला मान देऊन मी माझे भाषाशास्त्रासंबंधीचे विचार मांडण्यासाठी लेखन आरंभले. माझे या विषयातले चिंतन-मनन गेल्या कित्येक वर्षांपासून चालले होते ते स्पष्ट करण्यासाठी, आकारास आणण्यासाठी लेखनास सुरुवात झाली. हा मूळ उद्देश या ग्रंथामागे होता. मित्रांशी चर्चा करताना किंवा लिहिताना विचारांना नवेनवे फांगारे फुटू लागतात व अधिकच महत्त्वाच्या मुद्यांची भर पडायला लागते आणि मनात रुतून राहिलेले प्रकाशात येऊ लागते.

भाषाशास्त्रात केवळ ध्वनी आणि त्याची परिवर्तने यांवर भर दिला जातो, असा पृष्ठभागावरील प्रश्न हाताळणे म्हणजे भाषाशास्त्राचे कार्य आहे असे मला वाटत नव्हते. भाषेच्या मूळतत्त्वांचा गहन विचार न करणे ही एक मोठी उणीव मला जाणवत होती. वर्गात शिकण्यासाठी या तात्त्वज्ञानिक प्रश्नांची जरुर नाही असे गृहीत धरून ठराविक चाकोरीतूनच भाषाशास्त्राचा विचार होत होता. या विषयावर वाचन सतत चालू असताना, मला हवी असणारी विचारांची दिशा मला लीबनीझ या तत्त्वचिंतकाच्या चिंतनात सापडली. या चिंतनात अधिक व्याप्ती व सखोलता असल्यामुळे मला हवे असलेले नेमके गवसले व माझी दिशा सापडली. या विषयावर प्रकाशझोत पडल्याचा आनंद मला झाला. चर्चा करताना हुरूप वाटला. भाषाशास्त्रासंबंधी आता नव्या दृष्टिकोणातून काही विचार मांडता येतील हा विश्वास वाटला.

लीबनीझ हा भाषाविज्ञान, तत्त्वज्ञान, तर्कशास्त्र, गणितज्ज्ञ व संगणक शास्त्राचा प्रणेता - - अशा अनेकविध शास्त्रांतील तज्ज्ञ संशोधक होता. न्यूटन या प्रसिद्ध गणितीचा तो समकालीन होता, पण तो जर्मन असल्यामुळे त्याचे विचार युरोपमधील इतर देशांत पोहोचले नाहीत. फार प्रसिद्धीच्या प्रकाशात येण्याचे किंबहुना त्याने टाळले, पण स्वतःच्या काळाच्या फार पुढे असणाऱ्या लीबनीझचे संशोधन कित्येक शतकानंतर आज सर्व देशांत आणि सर्व क्षेत्रांत उपयुक्त ठरले आहे. आजची संगणकाची नवी पिढी लीबनीझच्या विचारप्रणालीवर पोसली जात आहे. यावरून त्याच्या विचारांची झेप किती प्रगत होती हे कळून येते. नव्या वैज्ञानिक प्रगतीचा तो फार मोठा आधारस्तंभ आहे यातच त्याच्या प्रगतीशील चिंतनाचे यश सामावले आहे. लीबनीझ याने भाषाशास्त्राच्या क्षेत्रात भाषेचा फार वेगळ्या दिशेने अभ्यास केला आहे. भाषा का बदलतात याला असलेले जैवनिक कार्य कारण त्याने प्रथम मांडले. जीवशास्त्रातील जिवंतपणा भाषेच्या बदलांना, परिवर्तनांना कारणीभूत असतो हे नवीन तत्त्व त्याने विचारात घेतले.

'भाषा' हा शब्द उच्चारताच या शब्दातून दोन अगदी वेगळे पदर सुटे होतात. भाषेचा-समाजातला संपर्क साधण्यासाठी, व्यावहारिक दैनंदिन जीवनाला उपयोगी असलेला सामाजिक पदर व दुसरा वैज्ञानिकांच्या क्षेत्रातील त्या त्या क्षेत्राला अनुकूल अशी प्रतीक भाषा हा पदर - ज्यात बौद्धिक विचारांच्या वैज्ञानिक अभिव्यक्तीसाठी चिन्हे किंवा प्रतीकांचा खास उपयोग करून निर्माण केलेली स्वतंत्र भाषा. वैज्ञानिक विचारांच्या अभिव्यक्तीसाठी ही सर्वोच्च बिंदू दर्शविणारी भाषा असे म्हणणे योग्य ठरेल. उदा., आईन्स्टीनची ही प्रतीकभाषा $E = mc^2$ इतकी सूत्रात्मक असेल की त्याच्या तोडीच्या संशोधकांनाच ती उमगेल. गणितशास्त्राला शून्य ० आणि १ ही (आकड्याची भाषा) चिन्हे मिळाली. ती अशा वैश्विक तत्त्वातून! लीबनीझच्या भाषाशास्त्रात जेव्हा भाषेच्या या मूलतत्त्वांचा 'उगमा' पासूनचा विचार आढळला तेव्हा मला भाषाशास्त्र हा एक प्रकाराचा कवडसा न वाटता, अनेक गोष्टींवर प्रकाश टाकणारा 'प्रकाश झोत' वाटला.

एक नवी दृष्टी मिळवणे हे महत्त्वाचे असते. तशी नवी दृष्टी एकदा का मिळाली की ज्या सूक्ष्मतेने दिसायला लागते त्यातून नवे रंग, नव्या छटा, नवे तरंग आणि सजीवता स्पष्ट व्हायला लागते. भेगाळलेल्या जमिनीकडे पाहत चालताना मातीच्या एखाद्या ढेकळातूनसुद्धा गोडसे गवती फूल वर आलेले जेव्हा दिसते तेव्हा सहजपणे मन आनंदाने लहरते. रूक्ष वाटणाऱ्या शास्त्रात देखील जिवंत तत्त्वे

आढळताच आनंद दुणावतो. लेखन करताना असा प्रत्यय येत होता.

विद्या दिल्याने ती घरातून जात नाही तर वृद्धिंगत होऊन ती आपल्याकडे येते. प्रेमाने, आदराने विद्यार्थी भेटायला येतात तेव्हा प्रेम आणि ज्ञान एकत्रच नांदत असते, याची जाणीव होते.

मी गुजरातचा पिढीजात रहिवासी आहे. मराठी ही जरी माझी मायबोली आहे तरी त्यात प्रादेशिक स्पर्शामुळे माझ्या मायभाषेत तुम्हांला वेगळेपण आढळेल. भाषेतल्या भौगोलिक संक्रमणाचे ते एक प्रात्यक्षिक ठरेल. पुष्कळदा योग्य शब्दासाठी किंवा शब्दप्रयोगासाठी अडण्याची वेळ येत असे. माझी पत्नी मुंबईकडील असल्यामुळे ती तात्काळ समर्पक शब्द व योजना सुचवायची. भाषेला यथार्थता व संयोजन यांची जोड लागतेच. तिची मदत मी या प्रकारे घेतली आहे.

सौ. सरोजिनी वैद्य आमच्या घरी आल्या असताना माझ्या पत्नीने मुंबईतील प्रकाशकांसंबधी माहिती विचारली. श्री. माहुलकर मराठी भाषाशास्त्रावर लिहीत आहेत ते नीट छापून देण्यासाठी कोणता प्रकाशक शोधावा यासाठी तिने ही विचारणा केली होती हे कळताच त्या म्हणाल्या "आम्ही छापू. हा आमच्या कामाशी संबंधित विषय आहे. आमच्याकडे ते काम द्या." (तोपर्यंत माझ्या पत्नीला मराठी विकास संस्थेबद्दल काही माहीत नव्हते. तिला आश्चर्य वाटले.) प्रकाशक घरी चालून आला असे क्वचित घडते.

खूप वाचावे लिहावे ही उमेद होती. आता यापुढे कितपत जमेल ते पहायचे. माझ्याही लेखणीला विश्रांती द्यावी लागेल. हे पुस्तक माझी आठवण म्हणून तुमच्या जवळ राहील. सर्वांचे आभार मानून मी आपला निरोप घेतो.

■

**मुद्रण दोषाची दुरुस्ती**

दिवाळी अंकात पान १८ वरील जाहिरातीमध्ये 'महादेव मोरेश्वर कुंटे' वाचावे.

### साद प्रतिसाद

# 'भाषा आणि जीवन'च्या अंकातील काही लेखांविषयी

म. अ. मेहेंदळे

## १

(वर्ष १६ : अंक ४ दिवाळी १९९८)

**१.१ शिवमुष्टिगंडु** - ब्रह्मानंद देशपांडे (पृ. ३३-३५)

ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायातील ६१६(७१६) क्रमांकाच्या ओवीत 'शिवमुष्टिगंडु' शब्द आढळतो. संदर्भानुसार त्याचा अर्थ 'पराकोटीचा गर्व, विलक्षण अहंमन्यता' असा होतो. हा अर्थ त्या शब्दाला कसा प्राप्त झाला असावा ह्याचा खुलासा देशपांडे यांनी सुचवला आहे.

मंगरुळकर-केळकर यांनी पूर्वी सुचविलेला खुलासा देशपांडे म्हणतात तसा अगदीच समजण्यासारखा नाही असे नाही. शिवमुष्टिगंडु शब्दाचा अर्थ 'शिवभक्ताचा (म्हणजे त्याच्याप्रमाणे वाटणारा) गर्व' असा अर्थ त्यांनी केला आहे. एखाद्या शिवभक्ताला शिव त्याच्या मुठीत आहे असा वृथा वाटणारा गर्व असे मंगरुळकर-केळकर यांना सुचवायचे असावे.

देशपांडे यांनी सुचविलेला खुलासा त्यापेक्षा अधिक समाधानकारक आहे. एखादा पदार्थ किंवा अन्य काहीतरी तोलून-मापून देताना तोल-माप पूर्ण झाल्यावरही पोकळशी मूठभर धान्य, किंवा अन्य जे काही तोलले जात असेल ते, भरावा टाकण्याचा प्रघात आहे. त्याला उद्देशून शिवमुष्टिगंडु शब्द प्रचारात आला असावा, ही देशपांडे यांची सूचना योग्य वाटते. थोडे धान्य भरीस टाकायच्या मुठीला शिवमुष्टि का म्हटले ह्याचा खुलासा ते दोन प्रकारे करतात. वरील प्रघाताला 'शिगोशिग देणे' असे म्हणतात. ह्यातल्या शिग शब्दाचे मूळ शिवमुष्टितल्या शिवमध्ये आहे असे मानले तर शिवमुष्टि म्हणजे शिगोशिग भरण्यासाठी टाकलेली मूठ असा अर्थ होऊ शकेल आणि 'परिपूर्ण' (more than perfect) अशा

मनोगंडाचा तो शब्द वाचक होऊ शकेल असे देशपांडे यांना वाटते, पण त्या खुलाशात शिव > शिग म्हणजे व > ग असे ध्वनिपरिवर्तन स्वीकारावे लागते, ते शक्य वाटत नाही. देशपांडे यांनी दिलेले एकमेव उदाहरण वृत्त > गिर्द > ग्रीद 'गोल फिरणे', अभ्यासकांना कितपत मान्य आहे - कल्पना नाही. तसेच ह्या खुलाशात शिव शब्दाला शिगने व्यक्त होणारा अर्थ होता असे मानावे लागते त्यासही आधार नाही.

देशपांडे यांचा दुसरा खुलासा समाधानकारक आहे. वर उल्लेखिलेल्या व्यवहारातील प्रघाताला विदर्भात भद्रमूठ म्हणतात. शिव आणि भद्र या शब्दांच्या अर्थांत साम्य असल्यामुळे विदर्भाबाहेर भद्रमूठ ऐवजी शिवमूठ असा शब्द प्रचारात असणे शक्य आहे. शिवमूठचे शिवमुष्टि हे संस्कृतीकरण आहे.

भद्रमूठ किंवा शिवमूठ पारड्यात टाकण्यापूर्वी तोल करण्याचे काम खरेतर संपलेले असते. तथापि गिऱ्हाइकाच्या समाधानासाठी पोकळशी मूठ भरीस टाकण्यात येते. ही शिवमूठ टाकल्यावर तोलण्याचे काम संपत असल्यामुळे शिवमुठीला वाटते, की दुसऱ्या पारड्यातील वजनाइतके वजन तिचे एकटीचेच आहे! शिवमुष्टीला वाटणाऱ्या ह्या अनाठायी गर्वाचा वाचक शिवमुष्टिगंडु हा शब्द आहे, 'परिपूर्ण' (more than perfect) या अर्थाचा नाही असे वाटते.

**१.२ 'साहित्य' या संज्ञेचा मूळ अर्थ** - मो. गो. धडफळे ( पृः ३६-४२).

Literature या अर्थी 'साहित्य' शब्दाचा प्रयोग होतो. हा शब्द कसा सिद्ध करायचा याची विद्वत्तापूर्ण चर्चा धडफळे यांनी केली आहे. Literature या अर्थी होणाऱ्या सहित्य शब्दाचे यापूर्वी झालेले तीन खुलासे धडफळे यांनी दिले आहेत : (१) साहित्य म्हणजे शब्द आणि अर्थ यांचे सहितत्व, साहचर्य. हा खुलासा संस्कृत काव्यशास्त्रकारांचा आहे; (२) साहित्य म्हणजे सामान्यतः कोठलीही सामग्री, आणि मग अलंकारादी अथवा रसपरिपोषक विशिष्ट सामग्री. हा खुलासा मा. गो. देशमुख आणि उषा. मा. देशमुख यांचा आहे; (३) साहित्य म्हणजे मानवी जीवनास हितकर ठरणारे लेखन[१]. हा खुलासा वा. गो. आपटे यांचा आहे.

ह्या तिन्ही खुलाशांत साहित्य शब्दाच्या मुळाशी सहित (स-हित) हा शब्द गृहीत धरला आहे. स-हित याचा अर्थ संबद्ध, शेजारी शेजारी ठेवलेले, अथवा हितकर असा केला आहे.

हे तिन्ही खुलासे धडफळे यांनी अव्हेरले आहेत.

साहित्य या शब्दाकडे ते अगदी निराळ्या स्वतंत्र वाटेने येतात. ऋग्वेद-

संहिता, मनुसंहिता अशांसारख्या ग्रंथनिर्देशात संहिता शब्दाचा होणारा प्रयोग आणि संहिता शब्दाने प्रतीत होणारा ग्रंथसमूह हा अर्थ ह्यांकडे ते वाचकांचे लक्ष वेधतात. संहिता शब्दापासून सिद्ध होणाऱ्या सांहित्य शब्दाचा ग्रंथसमूहत्व असा अर्थ होईल. हा सांहित्य शब्द साहित्य शब्दाचे मूळ आहे आणि त्याचाही अर्थ ग्रंथसमूहाचे अस्तित्व असा आहे असे धडफळे यांचे मत आहे.

साहित्य हे मूळ सांहित्य होते असा खुलासा जेव्हा धडफळे करतात तेव्हा मूळातल्या सांहित्य शब्दातल्या अनुस्वाराचा कालक्रमे लोप झाला - जसा नांव किंवा गांव शब्दातल्या अनुस्वाराचा लोप होऊन नाव, गाव शब्द रूढ झाले तसा - असे त्यांना म्हणावयाचे नाही. अनुस्वाराच्या लोपासाठी पाणिनीसूत्र ६.१.१४४[२] वरील काशिकावृत्तीत आढळणाऱ्या एका श्लोकवार्त्तिकाचा आधार त्यांनी घेतला आहे. धडफळे यांना ह्या वार्त्तिकाऐवजी पाणिनीच्या सूत्रावर कात्यायनाचे जे पहिले वार्त्तिक आहे (समो हिततततयोर्लोपः) त्याचा आधार घेता आला असता. अर्थात रूपसिद्धीच्या दृष्टीने त्यामुळे काही फरक पडत नाही. ह्या वार्त्तिकामुळे साहित्य हे सांहित्यचे वैकल्पिक रूप मानता येईल असा धडफळे यांचा खुलासा आहे.

कात्यायनाच्या वार्त्तिकामुळे भाषेत तत्कालीन परिस्थिती पुढीलप्रमाणे होती असे दिसते : पाणिनीने सूत्रात 'सातत्य' शब्दाचा प्रयोग केला आहे, म्हणजे तत्कालीन भाषेत तो शब्द प्रचारात होता. तो शब्द ज्या 'सतत' या शब्दावरून सिद्ध करायचा तो शब्द मात्र तत्कालीन भाषेत प्रचारात नव्हता.[३] भाषेत प्रचारात शब्द होता तो संतत[४] असा होता. संतत शब्दावरून सांतत्य शब्द सिद्ध होऊ शकेल, सातत्य नाही. सातत्य शब्दाच्या सिद्धीसाठी पाणिनीने काही सोय करून ठेवली नाही म्हणून कात्यायनाने वार्त्तिक रचून सतत हे संततचे वैकल्पिक रूप आहे असे मानावे असे म्हटले. सतत हे वैकल्पिक रूप हाताशी आले की त्यापासून सातत्य शब्द सिद्ध होऊ शकतो. (पाणिनिसूत्र ५.१.१२४).

सातत्य शब्दाच्या सिद्धीसाठी वार्त्तिक रचताना कात्यायनाने नुसते सतत हे संततचे वैकल्पिक रूप मानावे असे म्हटले नाही, तर त्याने त्याच्या जोडीला सहित हेदेखील संहितचे वैकल्पिक रूप मानावे असे म्हटले. असे करण्याचे काय प्रयोजन? वार्त्तिकामुळे असे दिसते की तत्कालीन भाषेत साहित्य हा शब्दही प्रचारात आला होता. त्याचा अर्थ परस्परांशी संलग्न असणे आणि संबद्ध असणे (association, connection) असा असावा. हा साहित्य शब्द संहित शब्दावरून सिद्ध होऊ शकत नसल्यामुळे कात्यायनाने संततच्या जोडीने सहित हे संहितचे वैकल्पिकरूप ठरविले.

ह्या सहित शब्दावरून साहित्य शब्द सिद्ध होऊ शकतो.

सातत्य आणि साहित्य यांची स्थिती अशी सारखीच आहे.

साहित्य शब्दाचे पूर्वी झालेले जे तीन खुलासे धडफळे यांनी सांगितले आहेत, त्यातल्या पहिल्या खुलाशात साहित्य शब्द सहित ह्या वैकल्पिक रूपावरून साधला आहे हे उघड आहे. दुसऱ्या खुलाशात अभिप्रेत असलेल्या साहित्य शब्दाचा सामग्री हा मराठीत रूढ असलेला अर्थ संस्कृत कोशात आढळत नाही. साहित्य शब्दात ग्रंथसमूहत्व अभिप्रेत आहे असे म्हणून त्याचा संबंध संहिता शब्दाशी लावण्याची धडफळे यांची कल्पना अभिनव आहे, त्यात संशय नाही, पण संहिता शब्दावरून साहित्यकडे येण्याचा जो मार्ग त्यांनी स्वीकारला आहे तो थोडा बदलायला हवा. ते म्हणतात की साहित्य हे सांहित्यचे वैकल्पिक रूप; परंतु सांहित्य शब्द अस्तित्वात नाही. मुळात अस्तित्वात नसलेल्या शब्दाचे अस्तित्वात असलेला शब्द हे वैकल्पिक रूप मानता येत नाही. कात्यायनानेसुद्धा सांतत्यचे सातत्य हे वैकल्पिक रूप मानले नाही. अस्तित्वात असलेल्या संततचे सतत हे वैकल्पिक रूप मानले. धडफळे यांनी कात्यायनाचा मार्ग स्वीकारून ग्रंथसमूह या अर्थी सहिता हा शब्द संहिता शब्दाचे वैकल्पिक रूप मानावे. अशा रीतीने हाताशी आलेल्या सहिता 'ग्रंथसमूह' शब्दापासून साहित्य 'ग्रंथसमूहाचे अस्तित्व' हा शब्द सिध्द होतो असे म्हणता येईल.

मला स्वतःला संस्कृत काव्यशास्त्रकारांनी केलेला साहित्य शब्दाचा खुलासा रुचतो.

## २

(वर्ष १७ : अंक ३ पावसाळा १९९९)

**२.१ एकविसावे शतक, तिसरे सहस्रक ...** - गं. ना. जोगळेकर (पृ. १-५)

एकविसावे शतक केव्हा सुरू झाले, मागच्या वर्षी १.१.२००० रोजी की यंदा १.१.२००१ रोजी, याविषयी संभ्रम निर्माण झाला होता. ते यंदा १.१.२००१ रोजी सुरू झाले ही एक साधी गोष्ट असूनही त्याविषयी संभ्रम का निर्माण व्हावा ते समजत नाही असे जोगळेकरांनी म्हटले आहे. संभ्रम निर्माण होण्यास कारण आहे. मागच्या वर्षी याविषयी चर्चा सुरू होती तेव्हा दैनिक 'सकाळ' मध्ये एका जाणकार पत्रलेखकाने नवे शतक १.१.२००० रोजी सुरू

होते असे का म्हणतात, त्याचा खुलासा केला होता. पत्रलेखकाचे नाव आता आठवत नाही. त्यांच्या म्हणण्याचा आशय पुढे दिल्याप्रमाणे होता असे वाटते. शास्त्रदृष्ट्या मूळ संख्या ० ते ९ अशा दहा असून, १० पासूनच्या पुढच्या संख्या पहिल्या मूळ संख्यांच्या साहाय्याने बनवल्या जातात. त्यामुळे शास्त्रदृष्ट्या पहिले दशक शून्यापासून सुरू होते आणि नवापाशी संपते. (माझ्या कल्पनेप्रमाणे उलटगणती (count down) चा शेवट एकापाशी होत नाही, शून्यापाशी होतो). त्या दृष्टीने पाहिल्यास पहिले दशक शून्यापासून ९ पर्यंतचे दुसरे १० पासून १९ पर्यंतचे इत्यादी. त्या गणनेप्रमाणे विसाव्या शतकाला १९०० च्या प्रारंभापासून सुरुवात झाली आणि १९९९ अखेर ते संपले. त्यापुढचे एकविसावे शतक १.१.२००० रोजी सुरू झाले.

शास्त्रदृष्ट्या हे म्हणणे योग्य असले तरी रोजच्या व्यवहारात गणनेची सुरुवात एकापासूनच होते आणि पहिले दशक दहापाशी संपते. कोणाला दहा रुपये द्यायचे झाल्यास नऊ देऊन चालत नाही, दहा द्यावे लागतात. तेव्हा व्यावहारिक दृष्टीने एकविसावे शतक जोगळेकर म्हणतात त्याप्रमाणे १.१.२००१ रोजी सुरू झाले असे मानणे योग्य आहे.

जोगळेकरांनी त्यांच्या लेखात मागील दोन सहस्रकांत घडलेल्या काही ठळक घटनांचा उल्लेख केला आहे. अशा धावत्या आढाव्यात मोजक्याच घटनांचा उल्लेख करणे शक्य होते हे खरे असले तरी, पहिल्या सहस्रकाच्या महत्त्वाच्या घटना सांगताना जरधुश्त्री धर्माचे लोक त्यांचा इराण देश सोडून भारतात कायम वास्तव्यासाठी आले त्या घटनेचा छोटासा तरी उल्लेख असायला हवा होता. भारताच्या औद्योगिक क्षेत्रात जरधुश्त्री लोकांचा वाटा फार मोलाचा आहे.

**२.२ अजयोऽयम् अजेयाकारो ....** - सत्त्वशीला सामंत (पृ. ४०-४१)

सामंत यांनी या लेखात अजय आणि अजेय शब्दांची चर्चा केली आहे. ओघाने अजय्यचा उल्लेख झाला आहे. त्यांचा निष्कर्ष असा की, अजय शब्दाचा वास्तविक अर्थ 'ज्याचा जय होत नाही' म्हणजे जो नेहमी पराभूत होतो, असा गौरवार्थी नसणारा आहे, पण रूढीने त्या शब्दाला 'ज्याचा कधी पराजय होत नाही' असा अगदी उलटा गौरवार्थी अर्थ प्राप्त झाला आहे. ह्या अर्थाला शास्त्रीय पाठबळ नाही. अजेय शब्द मात्र गौरवार्थी असून त्याचा 'अजिंक्य' असा अर्थ आहे. अजय्य ह्या आणखी एका शब्दाचा अर्थही अजिंक्य. एकंदरीत अजिंक्य या अर्थी संस्कृतात अजय, अजेय आणि अजय्य असे तीन शब्द आहेत.

माझ्या कल्पनेप्रमाणे वस्तुस्थिती आहे ती अशी :

१ अजय : ह्या शब्दाचा विशेषण आणि नाम असे दोन्ही उपयोग आढळतात.

१.१ विशेषण : अ) अर्थ 'अजिंक्य' (invincible). ह्या विशेषणाच्या 'न जयः यस्य' ह्या विग्रहवाक्यातील यस्य पदाची कर्मणि षष्ठी मानली म्हणजे 'ज्याला कोणी जिंकू शकत नाही' असा अजय शब्दाचा अर्थ होतो. हा गौरवदर्शक अर्थ आपटे यांच्या कोशात (नास्ति परैः जयः यस्य) दिला आहे. आपट्यांच्या आणि इतर कोशात या अर्थाची अनेक उदाहरणे आहेत.[५]

ब) अर्थ - 'जो कोणाला जिंकू शकत नाही'. हा अर्थ काशिकाकारांनी पाणिनिसूत्र ६.२.१५७ वर भाष्य करताना अजय हे उदाहरण (अन्तोदात्त) देताना सांगितला आहे (यः जेतुं न शक्नोति). या अर्थाचे संस्कृतात उदाहरण आढळत नाही. हा अर्थ गौरवार्थी नाही.[६]

१.२ नाम : अर्थ 'पराजय' (defeat) न जयः अजयः. या अर्थाची अनेक उदाहरणे कोशात आढळतात.

२. अजेय : हे विशेषण आहे. पाणिनिपरंपरेनुसार ह्या विशेषणाचा अर्थ 'ज्याला जिंकणे योग्य नाही' असा व्हायला हवा.

पाणिनिसूत्र 'क्षय्यजय्यौ शक्यार्थे' (६.१.८१) प्रमाणे जय्य शब्दाच्या प्रयोगाने 'ज्याला जिंकणे शक्य आहे' (शक्यो जेतुम्) असा अर्थ व्यक्त होतो. तेव्हा अजय्य शब्दाचा अर्थ 'ज्याला जिंकणे शक्य नाही' असा होईल. एका विशिष्ट अर्थी जय्य शब्दाचा प्रयोग पाणिनीने सांगितला आहे. तेव्हा टीकाकार असे सांगतात की, 'जेय' शब्दाचा प्रयोग 'ज्याला जिंकणे योग्य आहे' (जेतुं योग्यः) हा अर्थ व्यक्त करायचा असल्यास होतो. साहजिकच 'अजेय' शब्दाचा अर्थ 'ज्याला जिंकणे योग्य नाही' असा व्हायला हवा. उपलब्ध संस्कृत प्रयोगांत मात्र अजेयचा तसा अर्थ आढळत नाही. आढळतो तो अर्थ 'ज्याला जिंकणे शक्य नाही', म्हणजे अजय्यसारखा आढळतो. अजय्यचा अर्थ अजेय शब्दाला रूढीने प्राप्त झाला आहे. बोधलिंग-रोथ, मोनिअर-विल्यम्स्, डेक्कन कॉलेजचा कोश यांत अजेयचा हा रूढ अर्थ उपलब्ध संस्कृत वाङ्मयात आढळतो तसा म्हणजे invincible असाच दिला आहे.

पाणिनिपरंपरेनुसार अजेय शब्दाला असणारा अर्थ शब्दकल्पद्रुम या संस्कृत कोशात 'अजेतव्य, अजयनीय' (ज्याला जिंकणे योग्य नाही) असा आणि

आपट्यांच्या कोशात 'not fit to be conquered' असा दिला आहे. आपट्यांनी उदाहरण दिले नाही. शब्दकल्पद्रुमात 'अजेयस्त्वञ्च संग्रामे ममापि हि भविष्यसि' (स्कन्दपुराण, काशीखण्ड, २३.६०) हे एकच उदाहरण दिले आहे. संदर्भ शिवाने विष्णूची स्तुती करण्याचा असल्यामुळे शब्दकल्पद्रुमकारांनी ह्या श्लोकाचा अर्थ - युद्धात मला तू अजेय म्हणजे 'ज्याचा पराजय करणे योग्य नाही' असा होशील असा केलेला दिसतो; परंतु हे उदाहरण संदिग्ध आहे. अजेयचा 'अजिंक्य असाही अर्थ प्रस्तुत संदर्भात होऊ शकतो.[७]

३. अजय्य : अर्थ 'अजिंक्य'. ह्या अर्थासाठी वर उल्लेखिलेले पाणिनिसूत्र पाहावे. या अर्थाची कोशात अनेक उदाहरणे आहेत.

**निष्कर्ष**

१) 'अजिंक्य' अशा गौरवार्थी निःसंदिग्ध असा 'अजय्य' हा एकच शब्द आहे.

२) तो अर्थ व्यक्त करणारा अजय हा शब्द संदिग्ध आहे, कारण गौरवार्थी नसलेला त्याचा आणखी एक अर्थ होऊ शकतो.

३) अजेय या शब्दाला 'अजिंक्य' हा अर्थ रूढीने आला आहे. त्याला शास्त्राधार नाही.

**२.३ समस्त मराठीभाषाप्रेमींना अनावृत पत्र** - दिवाकर पुरुषोत्तम मोहनी (पृ. ४२-४६)

मराठी भाषेच्या भवितव्यतेविषयी वाटणाऱ्या चिंतेमुळे अतिशय तळमळीने मोहनी यांनी हे प्रकट पत्र लिहिले आहे. त्या पत्राचा सविस्तर विचार द. न. गोखले यांनी 'भाषा आणि जीवन'च्या १८व्या अंकात केला आहे. मोहनी यांच्या पत्रासंबंधी मी इतर काही विचार मांडीत आहे.

१) मराठी लिहिताना शुद्धलेखनाविषयी आढळणारी बेफिकिरी जायला हवी हा मोहनींचा आग्रह (पृ. ४५) रास्त आहे. ही बेफिकिरी पाहून मला असे वाटते, की मराठी लिहिणाऱ्या माणसाला असे वाटत असावे की त्याला जे म्हणावयाचे आहे ते दुसऱ्याला समजले म्हणजे झाले, मग लिहिताना शुद्धलेखनाच्या काही चुका झाल्या तरी हरकत नाही. असेही घडते की लेखकाने शुद्ध लिहिले असले तरी मुद्रित स्वरूपात वाचकाच्या समोर येताना ते शुद्ध असत नाही. अनेक मुद्रणदोष त्यात असतात. मुद्रक-प्रकाशकही याबाबतीत असावेत तितके जागरूक असत नाहीत. स्वतः लेखक मुद्रित तपासण्यास उत्सुक असतोच असेही नाही. ऱ्हस्व-दीर्घाच्या



अनुक्रमणिका

चुकीमुळे सर्वसाधारण व्यवहारात अर्थ समजण्यास अडथळा येत नसल्यामुळे अशा चुकांकडे दुर्लक्ष होते. दुकानाबाहेरच्या फलकावर धान्यांच्या यादीत गहू/गहु, तांदूळ/तांदुळ कसेही लिहिले तरी ती धान्ये खपतात. खपत नसती तर चुका झाल्या नसत्या.

२) मोहनी यांनी केलेल्या दोन सूचनांचा विचार अवश्य व्हायला हवा. त्यांची एक सूचना अशी, की शब्दकोश पाहण्याची सवय विद्यार्थ्यांना तसेच सर्वसामान्य मराठी भाषकाला लावायला हवी (पृ. १४). इंग्रजी लिहिताना स्पेलिंगविषयी शंका आली तर लेखक शब्दकोश पाहून खात्री करून घेतो. इंग्रजीतही edited / editted, interpret / interprete कसेही लिहिले तरी अर्थबोध होण्यास अडचण येणार नाही. तथापि, लेखक कोश पाहून खात्री करून घेतो. मराठी लिहिताना लेखक तसे करत नाही. करू लागला तर शुद्धलेखनातला पुष्कळसा गोंधळ कमी होईल.

गेले कित्येक महिने दैनिक 'सकाळ' मध्ये 'लेखन करा शुद्ध' हे एक उपयुक्त सदर प्रसिद्ध होत असते. एका मर्यादेत हे सदर कोशाचे काम करते. 'सकाळ'चे वाचक हे सदर वाचत असतील आणि स्वतःचे लेखन शुद्ध करण्याची आवश्यकता असल्यास तसे करत असतील अशी आशा आहे.

मोहनी यांची दुसरी सूचना अशी आहे : 'ज्याला शुद्ध लिहिण्याची सवय नाही पण सवय केल्यास जो शुद्ध लिहू शकेल त्याला विशेष प्रशिक्षण देणे,' (पृ.४४). 'भाषा आणि जीवन'च्या याच अंकातला जयश्री पाटणकरांचा 'भाषासंस्काराचे प्रयत्न' (पृ. ४७-४९) हा लेख त्यासाठी उपयुक्त आहे. मोहनींच्या सूचनेच्या दिशेने पाटणकरांचे प्रयत्न चालू आहेत. इतर शाळांतून त्यांचे अनुकरण व्हावे. पूर्वीचा शाळेतला विद्यार्थिवर्ग आणि सध्याचा वर्ग - विशेषतः ग्रामीण भागातला - यात फार फरक आहे. तेव्हा विद्यार्थांच्या शुद्धलेखनाचा प्रश्न जरा सबुरीने घ्यायला हवा असे वाटते.

लेखन शुद्ध ठेवण्याचा हेतू लेख वाचण्यास आणि त्याचा अर्थ समजण्यास अडथळे येऊ नयेत हा आहे. अर्थ समजण्यास इतरही काही गोष्टी अडथळे आणू शकतात, त्याही टाळणे इष्ट आहे. ह्या अडथळ्यांचा मराठीच्या शुद्धलेखनाशी संबंध नसला तरी त्याचा उल्लेख करावासा वाटतो. वाक्यातील शब्दांच्या दूरान्वयामुळे हा अडथळा निर्माण होतो.[८] मोहनी यांच्या लेखाच्या सुरुवातीस एक वाक्य असे आहे : "आयुष्यभर मुद्रणाचा व्यवसाय केल्यामुळे मराठीची जी अवनती आज झालेली आहे तिचा मी साक्षी आहे." पण आयुष्यभर मुद्रणाचा

व्यवसाय मराठीने केला नाही, तो केला आहे मोहनी यांनी. मोहनींना अभिप्रेत नसलेला अर्थ वाक्य वाचीत जाताना क्षणभर मनात येतो. त्यांना अभिप्रेत असलेला अर्थ नंतर ध्यानात येतो.

# ३

(वर्ष १८ : अंक १ हिवाळा २०००)

**३.१ प्रमाण मराठीच्या भवितव्याविषयी** – द. न. गोखले (पृ. ३७-४४)

वर उल्लेखिलेल्या मोहनींच्या या विषयावरील लेखात गोखले यांना 'शंकनीय व आक्षेपार्ह' समजुती वाटतात त्यांचा प्रथम निर्देश करून गोखले यांना त्या तशा का वाटतात याची त्यांनी सविस्तर चर्चा केली आहे. मोहनी आणि गोखले यांच्या भूमिकेत 'दोन ध्रुवांचे अंतर' आहे असे गोखले यांना वाटते (पृ. ४४).

मोहनी यांचा लेख वाचून माझी समजूत अशी झाली, की सध्या मराठीच्या लेखनात शुद्धलेखनाविषयी जी अराजकता आढळते त्यावर त्यांचा मुख्य आक्षेप आहे. लेखकाची बेफिकिरी आणि उच्चारानुसारी लेखनाविषयी असणारा काहींचा आग्रह यांमुळे ही अराजकता वाढत जाते असे मोहनी यांचे मत आहे. ही अराजकता नाहीशी करायची असेल तर भाषेच्या प्रमाणित, लिखित रूपात उच्चारानुसारी बदल करू नयेत, लेखनात सातत्य असावे ही मोहनी यांची मीमांसा काही मर्यादेपर्यंत ठीक वाटते. 'दसरा', 'सतरा' हे शब्द 'दस्रा', 'सत्रा' असे उच्चारानुसारी लिहू नयेत असा कोणी आग्रह धरला तर तो योग्य आहे. तसे उच्चारानुसारी लिहिलेले शब्द काही संदर्भ नसल्यास मराठी भाषकास अर्थशून्य वाटतील. तथापि गोखले म्हणतात तशी मराठीच्या लिखित रूपाला चिरंजीव अवस्था असावी अशी मोहनी यांची अपेक्षा असेल तर ती अवाजवी ठरेल. अशा मराठीची अवस्था कशी होईल ते गोखले यांनी सांगितले आहे. (पृ. ४२)

कोणत्याही भाषेच्या दोन कालखंडात त्या भाषेच्या स्वरूपात बदल जाणवतो हे विशद करण्यासाठी गोखल्यांनी प्रश्न केले आहेत : 'ज्ञानेश्वर मोरोपंतांप्रमाणे आर्याभारत लिहितील का? किंवा मोरोपंत ज्ञानेश्वरांप्रमाणे भावार्थदीपिका किंवा ज्ञानेश्वरी लिहितील का?' (पृ. ३८) त्यांचा पहिला प्रश्न अप्रस्तुत वाटतो, कारण ज्ञानेश्वरांना मोरोपंतकालीन भाषावस्था माहीत असणे अशक्य आहे तेव्हा त्या भाषेत ते लिहिण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. त्यांचा दुसरा प्रश्न योग्य आहे.



अनुक्रमणिका

गोखले यांच्या लेखातले एक वाक्य मला कळले नाही : ‘स्वतःला बहुमत-मान्य वाटणाऱ्या तज्ज्ञांची एक समिती शासनाने नेमली ...’ (पृ. ४०). मराठी भाषेच्या कोणत्या तज्ज्ञांना ते स्वतः ‘बहुमतमान्य’ असल्याचे वाटते? गोखले यांना असे म्हणावयाचे असल्यास न कळे : ‘स्वतःला बहुमतमान्य वाटणाऱ्या शासनाने तज्ज्ञांची एक समिती नेमली...’

जोडाक्षरे लिहिण्याच्या पद्धतीत बदल करण्याविषयी लिहिताना गोखले यांनी त्यांना आक्षेपार्ह वाटत नसलेली तीन उदाहरणे दिली आहेत (पृ. ४३). श्री ऐवजी श्‌री, द्व ऐवजी द्‌वा, आणि क्त ऐवजी क्‌त. जोडाक्षरे वाचण्याची डोळ्यांना झालेली सवय आणि वाचनाची सुलभता लक्षात घेता मला पहिल्या उदाहरणातील बदल आक्षेपार्ह, दुसऱ्यातला क्षम्य, आणि तिसऱ्यातला स्वागतार्ह वाटतो. विनोबांनी त्यांच्या पद्धतीने विष्णुसहस्रनाम प्रसिद्ध केले आहे. त्यांत जोडाक्षरातला रफार प्रामुख्याने टाळला आहे. त्यामुळे वाचन अवघड होते. सर्‌गो (सर्गो), शर्‌म (शर्म) अशांसारख्या शब्दांचे वाचन सहजपणे होत नाही.

शुद्धलेखनाविषयीची बेफिकिरी आणि ती घालवून त्यात राखायचे सातत्य ह्या संदर्भात गुजराती भाषेसाठी झालेल्या प्रयत्नांची थोडी माहिती घेणे उद्‌बोधक ठरेल. गुजराती भाषेच्या शुद्धलेखनाचे नियमन ‘जोडणीकोश’ या कोशाने अनेक वर्षे केले आहे. गुजरातीच्या लेखनातील कमालीच्या अराजकतेमुळे गांधीजी अस्वस्थ होते. येरवडा तुरुंगातून १९२४ साली सुटल्यावर त्यांनी या कोशाच्या संपादनासाठी ज्या तिघांची समिती नेमली, त्यात आचार्य काका कालेलकर प्रमुख होते. त्या कोशाची प्रथमावृत्ती १९२९ साली गुजरात विद्यापीठाने प्रसिद्ध केली. ‘नवजीवन’ च्या ७.४.१९२९ च्या अंकात या कोशाची नोंद गांधीजींनी घेतली. तेव्हा त्यांनी म्हटले, “नाकाशिवायचा मनुष्य जसा शोभत नाही, तसे शुद्धलेखनाशिवायच्या भाषेचे समजावे ... इंग्रजी भाषेतील शब्दांचे शुद्धलेखन चुकले तर आपल्याला लाज वाटते, त्यापेक्षा जास्त लाज आपल्याला मातृभाषेच्या शुद्धलेखनाचा वध केल्यावर वाटली पाहिजे. ह्यानंतर (म्हणजे ‘जोडणीकोशा’च्या प्रसिद्धीनंतर) कुणालाही स्वेच्छेने शुद्धलेखनात बदल करण्याचा अधिकार नाही. माझ्यासारख्या अर्धवट गुजराती जाणणाऱ्याने ह्या कोशाची मदत घेऊनच आपली कागदपत्रे लिहावीत अशी शिफारस मी करीत आहे.”

‘जोडणीकोशा’ची तिसरी आवृत्ती १९३७ साली प्रसिद्ध झाली. त्यानंतर ‘हरिजन बंधु’ च्या ४.२.१९४० च्या अंकात गांधीजींनी लिहिले : “जशी

अराजकता गुजराती'[९] शब्दांच्या शुद्धलेखनाविषयी आढळते तशी क्वचितच दुसऱ्या एखाद्या भाषेत असेल. मराठीत तशी नाही, बंगालीत नाही, तामिळमध्ये नाही, उर्दूत नाही, युरोपच्या भाषांत तर नाहीच नाही. ज्या भाषेच्या शब्दांचे शुद्धलेखन निश्चित झाले नसेल ती भाषा बोलणाऱ्यांना जंगली नाही म्हणायचे तर काय म्हणायचे ?"

'जोडणीकोशा'ची पाचवी आवृत्ती १९६७ साली प्रसिद्ध झाली. भांडारकर प्राच्यविद्या मंदिराच्या ग्रंथालयात ती आहे. त्यानंतरही काही आवृत्त्या निघाल्या असतील. गुजराती शुद्धलेखनावर 'जोडणीकोशा'ने बराच काळ अधिकार गाजवला असे दिसते. आता गेल्या काही दशकांत प्रसार माध्यमांचा आणि शिक्षणाचा प्रसार मोठ्या प्रमाणावर झाल्यावर गुजराती लोक लेखनाच्या शुद्धाशुद्धतेविषयी त्यांच्या दैनंदिन व्यवहारात किती प्रमाणात जागरूक आहेत त्याची कल्पना नाही.

**३.२ आंग्ल 'आर्ट' व संस्कृत 'कला'[१०]** - मो. गो. धडफळे (पृ. १४-१६)

धडफळे यांच्या मते art शब्दाचा मूळ अर्थ 'योग्य जुळणी, सुबद्धता' आणि कला शब्दाचा मूळ अर्थ' 'चांगुलपणा, सुंदरपणा'. तेव्हा art या इंग्रजी शब्दासाठी कला शब्दाचा उपयोग योग्य आहे. धडफळे यांचे मत पटण्यासारखे आहे.

परंतु या दोन शब्दांच्या निमित्ताने धडफळे यांनी इतर काही संस्कृत शब्दांची चर्चा केली आहे, तिचेविषयी उपलब्ध शब्दकोशांत जी माहिती मिळते ती वाचकांसाठी देत आहे.

१. संस्कृत ऋति म्हणजे 'रीत, पद्धत' (पृ. १४). धडफळे यांनी दिलेला हा अर्थ कोणत्याही कोशात आढळत नाही. कोशात ऋतिचा अर्थ 'हल्ला' (attack, assault) असा दिला आहे.

२. संस्कृत ऋत, ऋण, ऋति, अर हे सारे शब्द युरोभारतीय *ar - या धातूशी संबंधित आहेत असे धडफळे म्हणतात (पृ. १४-१५). संस्कृत ऋत इत्यादी शब्द आणि आणि संस्कृत अर् धातू यांविषयी मायरहोफर (Mayrhofer) यांच्या Etymologisches Woerterbuch des Altindoarischen (Etymological Dictionary of Oldindoaryan)[११] मध्ये पुढील माहिती आढळते.

संस्कृतात समान ध्वनिरूप असलेले (homophonous) दोन अर् धातू दिले आहेत : अर्[१] - आणि अर्[२]. ह्यांसाठी युरोभारतीय दोन धातू उत्प्रेक्षित झाले

आहेत : *$h_3$er आणि *$h_1$er. यांचा संस्कृतातील दोन अर् धातूंशी संबंध पुढीलप्रमाणे :

१) *$h_3$er > सं. अर्[१] (इयर्ति) अर्थ 'गति देणे; हलणे; उत्तेजित करणे' (to set in motion; to move (reflexive) ; to stir up, to excite).

२) *$h_1$er > सं. अर्[२] (ऋच्छति) अर्थ 'पोचणे, जाऊन मिळणे' (to reach, to meet).

वर उल्लेखिलेला संस्कृत ऋति 'हल्ला' हा शब्द अर्[२] पासून आला असल्याचे मानले आहे (कदाचित अर्[१] पासून असेही म्हटले आहे, म्हणजे खात्री नाही.)

३) ह्याखेरीज युरोभारतीय भाषेसाठी एक तिसरा *$h_2$er धातू पण उत्प्रेक्षित झाला आहे. त्याचा अर्थ 'जोडणे, एकमेकांत बसवणे' (to join, to fix) असा दिला आहे. ह्या तिसऱ्या धातूपासून संस्कृतात आणखी एक तिसरा अर् धातू उपलब्ध नाही, पण त्यापासून साधलेले अर म्हणजे 'आर' (spoke) हे नाम उपलब्ध आहे आणि ते ऋग्वेदाइतके प्राचीन आहे. संस्कृत ऋत शब्दही कदाचित ह्याच धातूपासून साधावा असे काही अभ्यासकांना वाटते.

संस्कृत ऋण शब्दाची व्युत्पत्ती निश्चित नाही.

तेव्हा युरोभारतीय भाषेसाठी तीन धातू उत्प्रेक्षित आहेत, एकच नाही. धडफळयांनी उल्लेखिलेल्या ऋति, अर, ऋत आणि ऋण या चार शब्दांपैकी ऋति आणि अर शब्दांची व्युत्पत्ती निश्चित आहे, ऋत ची शंकास्पद आहे, 'ऋण'ची व्युत्पत्ती निश्चित नाही.

३. कला : हा शब्द संस्कृत 'कल्' धातूपासून साधला असल्याचे आणि युरोभारतीय *kel 'चांगले असणे, सुंदर असणे' याच्याशी तो संबद्ध असल्याचे धडफळे यांनी मानले आहे.

संस्कृत कोशांत 'कल्' धातूचा 'चांगले असणे, सुंदर असणे' हा किंवा याच्या जवळपास येईल असा अर्थ दिला नाही. कोशांत दिलेले 'कल्' धातूचे अर्थ 'पुढे ढकलणे, पुढे हाकणे; पाठलाग करणे (to bush on, to drive forward; to persecute), किंवा 'उत्तेजित करणे' (incite), 'आवाज करणे' (to utter a sound) असे आहेत.

कला शब्दाचा ऋग्वेदादी प्राचीन ग्रंथात आढळणारा अर्थ 'भाग, सोळावा भाग' असा आहे. मायरहोफर यांच्या मते ह्या शब्दाची व्युत्पत्ती स्पष्ट नाही.

Art या अर्थी कला'[१२] शब्दाचा उपयोग वेदोत्तर वाङ्मयात आढळतो. या

अर्थी ही कला शब्दाची व्युत्पत्ती स्पष्ट नाही. पण याविषयी मायरहोफर यांनी प्रथम प्रसिद्ध केलेल्या (१९५६) A concine Etymological Sanskrit Dictionary Vol. I या ग्रंथात त्यांनी पुढील मत व्यक्त केले आहे: art या अर्थी संस्कृत कला शब्द द्राविडी भाषेतून उसनवारीने आला असावा. तामिळ व कन्नड भाषेत 'कल' to learn, तामिळभाषेत 'कलइ' art, science असे शब्द आहेत. त्या आधारे वरील तर्क त्यांनी केला आहे. मायरहोफर यांनी तिथेच लहान ठशात आणखीही एका मताचा उल्लेख केला आहे. अेफ ओ. श्राडर (F.O. Schrader) यांना art ह्या अर्थी संस्कृत कला शब्द द्राविडी भाषांतून उसनवारीने संस्कृतात आला आहे हे मत मान्य नाही. त्यांचे कला शब्दाच्या व्युत्पत्तीविषयीचे मत The Adyar Library Bulletin I.25 या नियतकालिकात प्रसिद्ध झाले आहे. कला (art) आणि कला (भाग, सोळावा भाग) हे दोन्ही शब्द युरोभारतीय *(s)quel 'कापणे, विभाग करणे, फोडणे' (to cut, to separate, to split) या धातूपासून आले आहेत असे श्राडर यांचे मत आहे.

ऋति इत्यादी शब्द तसेच कला हा शब्द यांच्याविषयी मायरहोफरच्या कोशाचा माहितीसाठी उल्लेख केला आहे. त्यात व्यक्त झालेले मत म्हणजे अखेरचा शब्द असे मानण्याचे कारण नाही, पण त्यांनी दिलेली माहिती विचारात घेणे इष्ट आहे.

कला शब्दाच्या निमित्ताने धडफळे यांनी कल्य आणि कल्यवर्त या शब्दांच्या अर्थाची चर्चा केली आहे. त्यांचे मत असे आहे : मृच्छकटिक नाटकाच्या पहिल्या अंकात मैत्रेय व चारुदत्त दोघांच्या बोलण्यात 'अर्थ-कल्यवर्ता' हा शब्द येतो. 'कल्य' चा सुंदर हा अर्थ न कळल्यामुळे अर्थ-कल्यवर्ता या शब्दाच्या अर्थाविषयी पूर्वीच्या सर्व अभ्यासकांची दिशाभूल झाली आहे. अभ्यासकांच्या मते कल्यवर्ता म्हणजे प्रातराश, न्याहारी, ती दुपारच्या मुख्य जेवणाच्या मानाने तोटकी, अल्प असते. म्हणून कल्यवर्ताचा 'तोटकी, बेताची स्थिती' असा अर्थ होतो आणि अर्थ-कल्यवर्ताचा अर्थ 'तोटकी आर्थिक स्थिती, निर्धन अवस्था' असा होतो. धडफळे यांच्या मते पूर्वीच्या अभ्यासकांचा हा अर्थ चुकीचा आहे. कल्य म्हणजे 'सुंदर', कल्यवर्ता म्हणजे 'सुस्थिती,' आणि अर्थकल्यवर्ता म्हणजे 'आर्थिक सुस्थिती, संपन्नावस्था' असा नेमका उलटा आहे (पृ. १६).

शब्दाच्या अर्थाविषयी धडफळे यांच्याशी माझा मतभेद आहे. तो सांगण्यापूर्वी त्यांनी केलेल्या विधानात दोन किरकोळ दुरुस्त्या करायला हव्यात.

मृच्छकटिकाच्या पहिल्या अंकात विवक्षित शब्द दोनदा आला आहे हे खरे (आर.डी. करमरकर प्रत, श्लोक १२-१३, १४-१५, पृ. १२,१३). पण दोन्ही ठिकाणी तो विदूषकाच्या तोंडी आहे, एकदा त्याच्या आणि एकदा चारुदत्ताच्या असे नाही. दुसरे असे, की शूद्रकाला अभिप्रेत शब्द अर्थकल्यवर्त (प्रा. अत्थकल्लवत्त) असा (पुल्लिंगी) आहे, अर्थकल्यवर्ता (प्रा. अत्थकल्लवत्ता) असा स्त्रीलिंगी नाही.

शब्दाच्या अर्थाच्या बाबतीत आधीच्या अभ्यासकांचा अर्थ बरोबर आहे, त्यांची दिशाभूल झालेली नाही. त्यासाठी शूद्रकाने कल्यवर्त शब्दाचा उपयोग नाटकात इतरत्र केला आहे तो पाहणे इष्ट आहे. इतर संदर्भांवरून कल्यवर्तचा अर्थ 'तोटकी स्थिती, नगण्य वस्तू' असा असल्याचे स्पष्ट आहे.[१३] नाटकाच्या दुसऱ्या अंकात (करमरकरप्रत, श्लोक १२-१३, पृ. ६२) दर्दुरक आणि माथुर यांच्या संवादात कल्यवर्त शब्द आढळतो. दर्दुरक माथुराला म्हणतो : "अरे, दहा सुवर्ण म्हणजे काय, केवळ कल्यवर्त!" त्यावर माथुर म्हणतो : "महाशय, तुम्हांला दहा सुवर्ण कल्यवर्त वाटत असतील, मला ते मोठे वैभव असल्यासारखे आहेत." ह्या ठिकाणी कल्यवर्त शब्दाचा अर्थ 'फार' महत्त्वाची नसलेली, नगण्य बाब' असा स्पष्ट आहे. तेव्हा त्या अर्थाचा संबंध कल्यवर्त म्हणजे न्याहारी ह्या अर्थाच्या शब्दाशी लावून त्यासारखी किरकोळ बाब असा अभ्यासकांनी उचित केला आहे.[१४]

नाटकाच्या चौथ्या अंकात (करमरकरप्रत, श्लोक ५-६, पृ. १११) शूद्रकाने कल्यवर्ताचा आणखी एकदा उपयोग केला आहे. तिथेही त्याचा अर्थ 'नगण्य, क्षुल्लक गोष्ट' असाच आहे. शर्विलकाला त्याच्या साहसाबद्दल दोष देताना मदनिका म्हणते : "स्त्रीकल्यवर्तासाठी चोरीचे साहस करताना शर्विलकाने आपले शरीर आणि चारित्र्य दोन्ही संकटात टाकले. स्त्रीकल्यवर्त ह्या सामासिक शब्दाचा अर्थ जसा 'स्त्रीसारखी किंवा स्त्रीरूपी क्षुल्लक गोष्ट' तसाच अर्थकल्यवर्त शब्दाचा अर्थ 'धनासारखी किंवा धनरूपी क्षुल्लक गोष्ट' असा आहे.[१५]

**टिपा** -

१. 'काव्यं .... शिवेतरक्षतये' काव्यप्रकाश १.२

२. धडफळे यांनी संदर्भ ४.१.१४४ दिला आहे तो ६.१.१४४ असा हवा.

३. उपलब्ध कोशानुसार 'सतत' शब्द मनुस्मृति, महाभारत या ग्रंथांत प्रथम आढळतो, म्हणजे त्याचा उपयोग कात्यायनाने वार्त्तिक रचल्यानंतरचा आहे.

४. संतत शब्दाचा उपयोग ब्राह्मणकालापासून आहे, सं-तन् ह्या धातूचा उपयोग ऋग्वेद काळापासून आहे. म्हणजे हे प्रयोग कात्यायन पूर्वकालीन आहेत.
५. अजय या शब्दाची अजिंक्य या अर्थाची उदाहरणे मोलिअर- विल्यम्सच्या कोशात नाहीत अशी सामंतांची तक्रार आहे, पण मोलिअर-विल्यम्स उदाहरणे अथवा संदर्भ कोठेच देत नाही. एखादा शब्द विशिष्ट अर्थी एक-दोनदाच आढळत असल्यास फारतर संदर्भ देतो, उदाहरण देत नाही.
६. अजय शब्दाचा हा गौरवपर नसलेला अर्थ 'न जयः यस्य' या विग्रह-वाक्यातील यस्य ही कर्तरि षष्ठी मानल्यानेही होतो.
७. डेक्कन कॉलेजच्या कोशात शब्दकल्पद्रुमात दिलेला स्कन्दपुराणातला संदर्भ दिला नाही. दुसरे दोन ६.४१.१५, ७(३).४९.७ दिले आहेत.
८. माझ्या लेखनातही हा दोष क्वचित डोकावतो.
९. खुद्द गूजरात ह्या शब्दाच्या लेखनातच गुजरात/गूजरात असा विकल्प मान्य आहे.
१०. शीर्षकात 'संस्कृत' कला असे अनवधानाने छापले आहे.
११. पहिला खंड १९८६-१९९२.
१२. वेदोत्तर वाङ्मयात आढळणारा कला शब्दाचा art हा अर्थ वेदांत त्या शब्दाचा 'भाग' असा जो अर्थ आहे, त्यापासून निष्पन्न झाला असण्याची शक्यता व्यक्त करण्यात आली आहे (कारण कलांची ६४ भागांत विभागणी मानली गेली आहे)
१३. इथे एकदा कल्यवर्त शब्द नपुंसकलिङ्गी आहे.
१४. कल्यवर्तचा 'न्याहारी' हा अर्थ हेमचन्द्र (अभिधानचिन्तामणि ४२५) आणि त्रिकाण्डशेष (२.९.१८) यांनी दिला आहे. कल्यवर्त 'न्याहारी' सारखा दुसरा कल्यजग्धि शब्द शब्दकल्पद्रुमकोशाने जटाधराच्या आधारे दिला आहे.
१५. अर्थकल्यवर्त हा शब्द नाटकात पुन्हा शकार (करमरकरप्रत, पृ. २६२, २८४), वृद्धा (वसन्तसेनेची आई) (पृ. २७५), विदूषक (पृ. २८३), पालक (शोधनकमुखाने) पृ. २८९), आणि चाण्डाल (पृ. २९६) यांच्या बोलण्यात येतो.

■

**बी-४, प्रबोधन सोसायटी, ६१ड/९-१०, एरंडवणे, पुणे ४११ ००४.**

# ‘दहा न् आठ, अठरा’ या लेखावरील प्रतिक्रिया

## १

## ‘दहा न् आठ.....’ आणखी काही

स. ह. देशपांडे

‘भाषा आणि जीवन’च्या वर्ष १९ अंक ४ यात ‘जाता जाता’ या सदरामध्ये ‘दहा न् आठ, अठरा’ हा डॉ. मो.गो. धडफळे यांचा रंजक माहितीने भरलेला व रंजक आणि संदर्भप्रचुर शैलीत लिहिलेला लेख वाचला. काही पूरक माहिती देणे, धडफळ्यांच्या काही मुद्द्यांबद्दल शंका उपस्थित करणे आणि एरवी या निमित्ताने मनात आलेले प्रश्न पुढे मांडणे असा या लेखाचा उद्देश आहे.

अर्थशास्त्राचा एक अभ्यासक म्हणून ‘गणन-सामर्थ्य’ (Counting ability किंवा Numeracy) या विषयाकडे माझे काही वर्षांपूर्वी लक्ष गेले. अर्थशास्त्राचे एक मूलभूत गृहीत असे आहे, की उपभोक्ता (Consumer) आणि उत्पादक (Producer किंवा Supplier) हे दोघेही ‘महत्तमीकरण’ (Maximization) करतात - उपभोक्ता आपल्या उपयोगितेचे किंवा समाधानाचे (Utility) व उत्पादक आपल्या नफ्याचे. आकडेमोड, विशेषतः साधे अंकगणित अवगत असल्याशिवाय हे शक्य नाही; म्हणून हे गृहीत अनेक समाजगटांना लागू पडत नाही; गणन-सामर्थ्य नसल्यामुळे अशा समाजगटांवर अनिष्ट परिणाम होतात; त्यांची काही स्वभाववैशिष्ट्येही या अभावातूनच निर्माण होतात - या प्रकारचे प्रतिपादन मी एका लेखात केले होते.[१]

त्या वेळी जो अभ्यास केला त्यातून पदरात पडलेली संबद्ध माहिती अशी : ‘.... अनेक जमातींच्या भाषांत दहापेक्षा अधिक संख्येला शब्द असत नाही; (१) काही भाषांत तर चारपेक्षा मोठ्या संख्येला शब्द नसतो. त्याहून अधिक संख्यांना ‘खूप’ (Plenty), ‘ढीग’ (Heap) असे शब्द वापरले जातात.[२] ‘ढीग’ किंवा ‘खूप’ची आठवण ठाणे जिल्ह्यातले ‘वारली’ हे आदिवासी करून देतात. त्यांचे गणनकौशल्य फार सीमित आहे. एखाद्या वारली माणसाला ‘तू किती वर्षांचा?’ असे विचारले तर तो म्हणेल, ‘पक्क्या (खूप) वरसांचा’[३]

'पाच' या संख्येचे समूह करून सांगण्याची पद्धत अजूनही खेडेगावातल्या बाजारात दिसेल : 'पाचुंदा'. एका हाताच्या बोटांवरून मोजण्याच्या प्रथेचा हा अवशेष असावा किंवा 'वीस'चा समूह. 'पाच विसा पगार मिळवते'[४]

ॲझटेक जमातीत व जाना बेटावरही आठवडा (?) पाच दिवसांचा असतो[५]

महाराष्ट्रातले इतर आदिवासी पाहिले तर असे दिसेल की 'कोलाम' पाचपर्यंतच मोजू शकतात[६] 'ठाकूर' वीसपर्यंत[७], 'भिल्ल' वीसपर्यंत[८]. 'कातकऱ्यां'ची गणनशक्तीही मर्यादितच आहे.[९]

(२) आता सार्वत्रिक दशमानीकरण झाले आहे, पण दिवसाचे तास अजून चोवीस! हे कसे निर्माण झाले व का राहिले?

(३) आता 'फूट' किंवा 'मीटर' - आणि इतर मापने प्रमाणित झालेली आहेत. पूर्वी ढोबळमानाने मोजमापे करीत. उदा., जमीन किती? तर, इतके 'गोत्रर्म'. (बैलाचे कातडे) 'गोत्रर्मा'चे उल्लेख संस्कृत वाङ्मयात अनेक ठिकाणी आहेत.[१०] तसेच 'वीत' ('पाच विती रुंद'), 'हात' ('साप चार हात लांब होता'), 'पुरुष' ('विहीर चार पुरुष खोल') शेंडीभोवतालचा घेरा किती असावा? 'गोपद्माएवढा'.

विलेपार्ल्यात सहकारी गृहनिर्माण संस्थांचा धडाका उडवणारे कर्तबगार निर्माते श्री. बाबूराव परांजपे यांच्याविषयी अशी गोष्ट ऐकली आहे की, ते टेपवाले इंजिनिअर, आर्किटेक्ट यांना बाजूला सारून ढांगा टाकीत जात व अंतरे मोजीत!

(४) 'गण' म्हणजे समूह. ज्याची 'गणना' करावी लागते तो?

आपटे यांच्या संस्कृत-इंग्रजी कोशात 'गण' याचा एक अर्थ 'अक्षौहिणीचा एक लहान विभाग' असा दिला आहे. अठरा अक्षौहिणी व अक्षौहिणीचे विभाग यांचा निर्देश करणाऱ्या धडफळ्यांना कोशात पुढे दिलेली माहिती गमतीची वाटेल : गणात २७ रथ, ८१ घोडे व १३५ पदाती असत. प्रत्येकातल्या अंकांची बेरीज ९!

इस्लामच्या धार्मिक वाङ्मयात ७० व ७०च्या पटीतील अंक मुबलक वापरलेले दिसतात. प्रा. शेषराव मोरे सांगतात, 'इस्लामच्या इतिहासामध्ये ७० ही संख्या नेहमी येताना दिसते. या संख्येच्या जवळपास आकडा असला की तो ७० सांगण्याची लोकप्रिय पद्धत असावी असे दिसते.... संख्या प्रचंड असेल तर ती ७० हजार सांगितली जाते. उदा. ७० हजार देवदूत.... प्रेषितांनी मक्केला बळीसाठी

उंट ७० (दिले) ....' वगैरे[११].

धडफळे यांनी 'अठरा'विषयी जे लिहिले आहे, आपटे कोशात 'गणा'च्या अंकांची जी बेरीज दिली आहे, इस्लामी वाङ्मयात ७० व त्याच्या पटीचे जे उल्लेख आहेत ते सर्व जर काल्पनिक असतील तर ज्या वाङ्मयात असे उल्लेख येतात त्या एकूण काल्पनिकाचे, नुसत्या काल्पनिक संख्यांचे नव्हे, प्रमाण मोठे असावे अशी शंका येणे संभाव्य आहे.

(५) 'छपन्न' ('छप्पन') - विषयी तो 'षट्प्रज्ञ'चा अपभ्रंश आहे हे धडफळे यांचे विधान शंकास्पद आहे. कारण केवळ एक संख्या या अर्थाने हा शब्द अनेक संदर्भांत येतो. संस्कृताचे निवृत्त प्राध्यापक श्री. निपाणीकर यांनी 'छपन्न' या विषयावर एक लेख किंवा टिपण कोठे तरी लिहिल्याचे आठवते. छपन्नचे त्यांनी दिलेल्या संदर्भांशिवायचे आणखी काही संदर्भ मीही त्यांना लिहून पाठविले होते, ते आता विसरलो; पण या संदर्भात महत्त्वाची गोष्ट म्हणजे श्रीधर शामराव हणमंते यांचा संकेत - कोश. हा मराठीतला एक मूल्यवान पण दुर्लक्षित ग्रंथ असावा. त्यात छपन्न संस्कृत कोश-ग्रंथ, छपन्न देश व छपन्न भाषा यांच्या याद्याच दिलेल्या आहेत[१२].

(६) आणखी गंमत म्हणजे धडफळे यांचे 'विद्वान स्नेही' सॅन सरीन यांनी दिलेले हिशेब संकेत-कोशात उपलब्ध आहेत आणि संकेत-कोशाचे प्रकाशन-वर्ष १९५८ आहे! (दु.आ. १९६४ माझ्या पाहण्यात ही आवृत्ती आहे.) एकच फरक आहे. पदातींची संख्या धडफळे यांनी उद्‌धृत केल्याप्रमाणे १०३५० आहे, तर संकेत-कोशात १०९३५० आहे. म्हणजे शेवटचे शून्यच नव्हे तर १० तले शून्य गाळूनही अंकांची बेरीज १८ येते.

शिवाय पुढे आणखी माहिती आहे ती 'चमू'ची. रथ - ७२९ (७ + २ + ९ = १८) एक चमू म्हणजे २७ रथांचा औरसचौरस चौकोन. म्हणजे २७ रथांच्या २७ ओळी.

१८ या आकड्याखाली अठरांचे ५९ समूह हणमंते यांनी दिले आहेत.

'परार्धा'त १ वर १८ शून्ये असे धडफळे यांनी म्हटले आहे. ते १७ हवे. तरच एकूण अंकांची बेरीज १८ होईल.

महाभारतांतर्गत समूह (उदा. भारतीय युद्धाचे दिवस, पांडवांकडील प्रमुख वीर इ.) १८ च.[१३]

कटपयादी सांकेतिक भाषेत 'ज' हा वर्ण ८ या अंकाचा निदर्शक तर 'य'

हा १ या अंकाचा. 'अङ्कानां वामतो गतिः' या न्यायाने 'जय' म्हणजे १८ आणि 'जय' म्हणजे महाभारतही[१४].

(७) शेवटी दोन प्रश्न -

अ) मानवेतर प्राणी मोजू शकतात काय? कावळे ३ पर्यंत मोजू शकतात असे सिद्ध करणारा एक प्रयोग एका मानसशास्त्रज्ञाने केल्याचे माझ्या वाचनात आहे.

आ) लहानपणी खेडेगावी खेळायला बसलो असताना कुणी मूल खेळगडी मोजू लागले तर मोठी माणसे म्हणत, 'माणसे मोजू नयेत, मोजली तर ती मरतात.' असा काही लोकभ्रम सार्वत्रिक होता काय? निदान लोकजीवनात? तसे असल्यास त्यामुळे लोकजीवनावर एका वेगळ्या दृष्टीने प्रकाश पडेल असे वाटते.

**टिपा -**

१. *स.ह. देशपांडे, 'महत्तमीकरण आणि गणनसामर्थ्य', **अर्थसंवाद** एप्रिल-जून १९७८. किंवा S.H. Deshpande, 'Innumeracy and Economic Behaviour', Economic and Political Weekly, Vol. XVI, Nos. 10, 11, 12, Annual Number 1981.*

२. *W.W. Rouse Ball, **A Short Account of the History of Mathematics**, Macmillan, London, 1912 PP.2-3.*

३. *वारली मुलांच्या गणनशक्तीबद्दलची अनेक उदाहरणे ताराबाई मोडक व अनुताई वाघ यांनी दिली आहेत. उदा. **कुरणशाळा**, ग्रामबालशिक्षा केंद्र, कोसबाड हिल, १९६४, पृ. १७, १९, २२ इ. आणखीही बरेच वाङ्मय आहे पण स्थलमर्यादा पाळावी म्हणून येथे देत नाही.*

४. *स.ह. देशपांडे, 'जीवंतिका' (अनुताई वाघ), **शारदत**, सुपर्ण, पुणे १९८९.*

५. *W.W. Rouse Ball, **पूर्वोक्त**, पृ. 122.*

६. *भाऊ मांडवकर, कोलाम, सेवा प्रकाशन, अमरावती, १९६६, पृ. २८०.*

७. *L.N. Chapekar **Thakurs of Sahyadri**, London, O.U.P. 1960, P. 103.*

८. *D. Symington, **Report on the Aboriginal and Hill Tribes** ....., Government of Bombay, 1939, P. 13.*

९. ***तत्रैव.***

१०. *स.ह. देशपांडे, 'विश्वव्यापी बैलाचे कातडे', **काही आर्थिक, काही सामाजिक**, मौज, मुंबई २०००, पृ. १४४.*

११. *शेषराव मोरे, **मुस्लिम मनाचा शोध**, संगत प्रकाशन, नांदेड, २००१, पृ. १५२, पदटीप २५.*

*१२. श्री. शा. हणमंते,* ***संकेत-कोश,*** *कमळाबाई बेंद्रे, सोलापूर, शके १८८५, पृ. ३७६-७७.*
*१३.* ***तत्रैव,*** *पृ. ३३४.*
*१४.* ***तत्रैव,*** *परिशिष्ट १ले, पृ. ४०९.*

■

**सी-२८, गंगाविष्णू संकुल, प्रतिज्ञा हॉल समोर, कर्वेनगर, पुणे ४११ ०५२.**

## २

## एक साद

**मनोहर राईलकर**

भाषा आणि जीवनच्या दिवाळी २००१ च्या अंकात प्रा. मो. गो. धडफळे यांचा 'दहा न् आठ, अठरा' ह्या शीर्षकाचा लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यावरील माझी ही प्रतिक्रिया.

१) भारतीयांची पद्धती अष्टमान असावी, हा त्यांचा अंदाज मला बरोबर वाटतो. कारण केवळ संस्कृतच काय पण अनेक भाषांत नऊ आणि नवीन या दोन्ही अर्थांकरिता एकच शब्द असल्याचं आढळतं. येथे एक यादी दिली आहे. त्यावरून हे स्पष्ट होईल.

| भाषा | नवीन | नऊ |
|---|---|---|
| संस्कृत | नव | नव |
| हिंदी-उर्दू | नव | नव |
| कश्मीरी | नौव् | नव् |
| सिंधी | नँओ | नँवँ |
| गुजराती | नवो | नव |
| ओडिया | नूआ | न |
| फ्रेंच | neuf | neuf |
| जर्मन | neu | neun |

(भारतीय भाषांतील ही नावं मी श्री. विश्वनाथ नरवणे यांच्या भारतीय व्यवहार कोशातून घेतली आहेत. फ्रेंच आणि जर्मन नावं संबंधित कोशातून.)

त्याचं एकच कारण संभवतं. ते म्हणजे दशमान पद्धतीचा उगम भारतात झाला. मग संख्याचिन्हं आणि त्यांची नावं इथून अरबस्तानात आणि तिथून युरोपात पसरली. त्यामुळंच तर संख्याचिन्हांना हिंदू संख्याचिन्हं असं युरोपात म्हटलं जातं. अर्थात, काही लोक त्यांना केवळ










अरेबिक न्यूमरल्स किंवा हिंदु-अरेबिक न्यूमरल्स म्हणतात. आठाबद्दल पुराणात अनेक उदाहरणं (अष्टावसु) सापडतील. अष्ट शब्दानं साकल्य किंवा अंकांची सीमा सूचित केली जात असावी. त्यावरूनच अष्टावधानी म्हणजे सर्वत्र अवधान असणारा हा अर्थ ठरत असावा. अष्टावक्र म्हणजे अनेक ठिकाणी वाकडी असणारी, अष्टसिद्धी म्हणजे सर्व सिद्धी. अष्टनायिका हे आणखी एक उदाहरण. शांत हा स्वतंत्र रस मानला जात नाही. त्यामुळं रसही आठच असावेत. कृष्णाला पूर्णावतार म्हणतात. तेव्हा तिथं अवतार संपत असावेत. हिंदूंच्या समावेशक गुणांमुळं त्यांनी बुद्धालाही अवतार (नवा किंवा नववा) मानलं असणार. हे माझे केवळ अंदाज आहेत. शिवाजीराजांचं अष्टप्रधान (साकल्य) मंडळ प्रसिद्धच होतं. समर्थांनीही करुण-अष्टकंच लिहिली होती आणि मंगलाष्टकं तर सुप्रसिद्धच आहेत. तेव्हा आठ म्हणजे सर्वच असं असणार. आणखी एक (कदाचित) ओढून ताणून सांगायचं तर वाल्मीकिऋषींच्या तोंडून उत्स्फूर्तपणं बाहेर आलेला पहिला श्लोक अनुष्टुभ वृत्तात होता आणि याच्या प्रत्येक चरणात आठ अक्षरं असतात.

२) नाणी अष्टमान असावीत याचं एक अनुमानिक प्रमाण म्हणजे प्रा. धडफळ्यांनी सुचवलेलं नऊचं नव हे नामाभिधान आहेच. पण, आणखी एक प्रमाण देता येईल- पूर्वी रुपयाचे ६४ पैसे असत आणि ६४ हा ८ चा (जसा १०० हा १० चा) वर्ग आहे. पण, मूलतः आपली पद्धत द्विमान असावी. कारण दोन पैसे = एक ढब्बू. दोन ढब्बू = एक आणा. दोन आणे = एक चवली. दोन चवल्या = एक पावली. दोन पावल्या = एक अधेली आणि दोन अधेल्या = एक रुपया.

३) गणवृत्ताच्या गणांची संख्याही आठच असते. त्याचंही कारण मुळात द्विमान पद्धत असावी, हेच होय. कवितेतील अक्षरांचे लघू व गुरू असे दोन पर्याय असतात. त्यामुळंच तीन अक्षरी गणांची संख्या आठ होते. दोन अक्षरांचा गण केला असता तर गणांची संख्या चार आणि चार अक्षरी गण केला असता तर सोळा झाली असती. निरनिराळ्या कारणास्तव त्यावेळच्या पंडितांना दोन्ही गैरसोयीच्या वाटल्या असाव्यात. याचा तपशीलवार विचार मी 'गण... संगणक' ह्या लेखात मी सविस्तर मांडला आहे. (भाषा आणि जीवन अंक १/ हिवाळा १९९५) संगणकातही (द्विमान पद्धतीवर आधारित) अष्टमान (ऑक्टल) पद्धतीचा वापर करतात.

४) दोन किंवा दोनाचे घात असलेल्या संख्येइतक्या मात्रा असलेले ताल प्रसिद्ध आहेत आणि ते स्वाभाविक आहेत. कहरवा (४ मात्रा), धुमाळी (८ मात्रा), त्रिताल (१६ मात्रा), याचं कारण, वस्तूचे (काळाचेही) दोन भाग

करणं सर्वात सोपं असतं. चौरस कागदाची घडी घातली की झालं. अपूर्णांक शिकवताना शिक्षकांच्या हे अनुभवाला येतंच. गायकालासुद्धा गाणं म्हणताना मध्ये दुप्पट किंवा चौपटीनं लय वाढवणं, किंवा तबलजीला तबला वाजवताना दुप्पट किंवा चौपट करणं सोपं जातं. तिप्पट (दीडपट) करण्याकरता जरा जास्तच कौशल्य आणि प्रशिक्षण लागतं. केवळ सरळपट्टी आणि कंपास यांच्या साह्यानं यादृच्छिक कोनाचे दोन भाग करता येतात. पण तीन येत नाहीत, हे सिद्ध झालं आहे. त्यामुळं चौरस, अष्टभुज, षोडशभुज इत्यादी आकृती वर्तुळात सहज अंतर्लिखित करता येतात.

५) भारतीय ज्योतिर्विदांनी दिवसाचेही आठ भाग केले आहेत. (त्यांना त्यांनी प्रहर म्हटलं असल्याचं आपण जाणतोच.) दिवसभर या अर्थी अष्टौप्रहर (पुन्हा साकल्य) हा शब्द भाषेत रूढ आहेच.

६) ऑक्टोचा अष्टशी त्यांनी जोडलेला संबंधही बरोबर आहे. याचं कारण पहिल्या परिच्छेदात स्पष्ट केलं आहे. ऑक्टॅगॉन (अष्टभुज आकृती), ऑक्टॅहेड्रॉन (अष्टपृष्ठ), ऑक्टोपस (अनेक या अर्थी), आठ हात (किंवा पाय) असलेला प्राणी, हे तर सुप्रसिद्ध आहेत.

७) अधस् आणि ऊर्ध्व दिशा सोडल्या तर प्रमुख दिशाही आठच असतात. त्यामुळंच कदाचित यज्ञकुंडांना आठ बाजू असाव्यात. ह्या दिशा का सोडायच्या? तर मनुष्य हा व्यवहारतः द्विमितीच प्राणी आहे. एखाद्या चक्रव्यूहात अडकल्यावर आपल्याला ते चांगलंच जाणवेल. कागदावरचा चक्रव्यूह सोडवणं तुलनेनं सोपं जातं त्याचं कारण आपण तिसऱ्या मितीतून त्याचं निरीक्षण करतो हे आहे. नकाशा पाहणं सोपं पण, त्यावरून एखादं ठिकाण शोधून काढणं अवघड जातं. म्हणून काही एका अर्थानं आठच दिशा राहतात. अन्यथा मधल्या ४५ अंशाच्या सर्वच दिशांचा अंतर्भाव करण्याकरता सव्वीस दिशा हव्यात. दहा पुरणार नाहीत.

८) ऑक्टोबर (आठवा महिना), नोव्हेंबर, डिसेंबर ह्या नावांबाबतचं प्रा. धडफळे यांचं निरीक्षण बरोबर आहे. पण त्यात सप्टेंबरचाही (सप्तम) अंतर्भाव करायला हवा. वस्तुतः हे अनुक्रमे सातवा, आठवा, नववा आणि दहावा असेच महिने आहेत. हे माझं म्हणणं कदाचित नवलाचं वाटेल. पण पूर्वी वर्षारंभ २५ मार्चला होत असे. आणि तेच योग्य. कारण वसंत संपात (सूर्याचा विषुववृत्त ओलांडून उत्तर गोलार्धात प्रवेश) २१/२२ मार्चला असतो. २१/२२ ऐवजी २५ ही त्या काळातली चूक क्षम्य आहे. त्यामुळेच सप्टेंबरपासूनच्या महिन्यांना सातवा,

आठवा इ. अशी क्रमांकयुक्त नावं पडली हे स्वाभाविक आहे. डिसेंबर दहावा महिना याविषयी आणखी एक - डिसेंबर महिन्याला एक्समस म्हणतात, हे आपण जाणतो.' इंग्रजीतलं X हे अक्षर १० (रोमन) ही संख्या दाखवण्याकरता वापरतात. 'मस' म्हणजे मास किंवा महिना, यावरून एक्समस म्हणजे दहावा महिना हाही अर्थ उलगडतो. यावरून नाताळचा आरंभ २५ डिसेंबरला म्हणजे दहाव्या महिन्याच्या पहिल्या दिवशी असतो, असं म्हणता येईल.

योगायोगानं मीही आठच मुद्दे मांडले आहेत !

■

**'मृण्मयी', ५६ जेधे नगर, बिबवेवाडी, पुणे ३७.**

## ३

**म. ना. गोगटे**

आपल्या दिवाळी २००१ अंकात डॉ. मो. गो. धडफळे यांचा अंकविषयक उपयुक्त लेख आहे. त्यात नमूद केले आहे की दशमान व अष्टमान ही गणनारीती अनुक्रमे आर्यांची व द्रवीडांची आहे. मला ही नवीन माहिती मिळाली. मी इंजीनियरिंग कॉलेजात विद्यार्थी होतो तेव्हा (१९५०-५३) बारा-मान (duodecimal) व दोन-मान (binary) या गणनारीतींचा उडता उल्लेख गणिताच्या प्राध्यापकांनी केला होता. बाराला दोन व तीन या दोन्हींचा भाग जातो, बारा इंच म्हणजे एक फूट, बारा पेनी म्हणजे एक शिलिंग असे संदर्भ त्यांनी सांगितले. गणकयंत्रांचा सार्वत्रिक उदय तेव्हा झाला नव्हता. दोन-मान पद्धत गणकयंत्रात on, off विद्युत्संकेतांसाठी उपयोगी आहे एवढेच तेव्हा समजले होते.

त्याच लेखात चौदा रत्नांची माहिती आहे. १९४४-४८ या कालात मी शाळेत संस्कृत शिकलो, तेव्हा शिक्षकांनी या रत्नांचा उल्लेख असलेले मंगलाष्टक सांगितले. त्यातील काही शब्द असे आहेत - - - विषं हरिधनुः शंखोमृतं चांबुधेः - - - यामध्ये चांबुधेः = च + अंबुधेः ही फोड आहे. (च = आणि) (अंबुधेः = समुद्रातून). चांबुधेः हा शब्द (चाबूक) समान दिसतो. म्हणून चाबकाचा मार = चौदावे रत्न असा विपरित अर्थ प्रचारात आला असे सांगण्यात आले. शिक्षकांनी ही व्युत्पत्ती गंभीरपणे सांगितली की विनोदाने आठवत नाही.

बहुधा विनोद असावा. पु. ल. देशपांडे यानी एके ठिकाणी लिहिलेला विनोद आठवतो. अर्जुनाचा जन्म केव्हा झाला याचा पुरावा गीतेत आहे. (अध्याय ४, श्लोक ५) कृष्ण म्हणतो - - बहूनि मे व्यतीतानी जन्मानि तव चार्जुन = अर्जुना, माझे (मे) व तुझे (तव) खूप जन्म होऊन गेले. विनोदी अर्थ असा - - मे महिना पूर्णपणे संपला, तुझा जन्म चार जून रोजीचा.

■

४ पवन अपार्टमेंट, लक्ष्मी पार्क, नवी पेट, पुणे ४११ ०३०

(मो. गो. धडफळे यांची प्रतिक्रिया पुढील अंकात पाहावी - संपादक)

**साद आणि प्रतिसाद**

## "जातीचे शब्द - शब्दांची जात" एक उत्तम लेख

**मो. गो. धडफळे**

'भाषा व जीवन'च्या १९:४ / दिवाळी २००१ / या अंकात सौ. मृणालिनी गडकरी यांचा चांद्रसेनीय कायस्थ प्रभूंच्या पाकसंस्कृतीशी संबंधित अतिशय ललित शैलीत लिहिलेला खुमासदार लेख मला आवडला.

तरी परिपूर्णतेसाठी एका अधिक पदार्थाची फर्माईश करू चाहतो. माशांच्या डोक्याच्या भागांचे झकास तिखट कालवण करावे तर ते आमच्या समस्त सीकेपी वहिन्यांनीच आणि त्याचा निर्देशकही 'ठसके'बाज संक्षेपात करण्यातच खुमार आहे. "आमच्याकडे आज डोकल्यांचं केलं होतं!" 'कालवण' पोटात गेल्यावर त्याचा वाचक शब्द 'अध्याहृत'च होणार की!

■

यशोदीप-ब, सदनिका क्र. २, रामवाग कॉलनी, सदाशिव पेट, पुणे ४११ ०३०.

**मराठी अभ्यास परिषदेचे संस्थापक व अध्यक्ष डॉ. अशोक केळकर यांना भारत सरकारने २६ जानेवारी २००२ रोजी "पद्मश्री" ही पदवी जाहीर केली त्याबद्दल मराठी अभ्यास परिषदेतर्फे त्यांचे हार्दिक अभिनंदन.**

**- संपादक**










# भारतीय मामा : काही दुरुस्ती, काही पुस्ती

अशोक रा. केळकर

संदर्भ : भाषा आणि जीवन १९:१ हिवाळा २००१, पंचानन महांती, भारतीय भाषांमधील इतर मामा : एक शोध. पृ. ७-२३.

अनुवादक पद्माकर दादेगावकर आणि लेखक महांती यांना अशोक रा. केळकर यांचे पत्र (संक्षेपाने) :

मूळ लेख आणि अनुवाद आवडला.

काही किरकोळ चुका मूळ लेखात / मराठी अनुवादात राहून गेल्या आहेत.

फ्रायडरीच (पृ. ८, १४) नको, फ्रीडरिच असे अमेरिकन नाव पाहिजे.

जुनी उच्च जर्मन (पृ.१३) नको, जुनी पहाडी जर्मन पाहिजे. Choch Deutsch आणि platt Deutsch हे उपभेद सामाजिक स्तरावर आधारलेले नसून जर्मनभाषी प्रदेशाच्या भूगोलावर आधारलेले आहेत.

रेडक्लिफ जाऊन (पृ. १५) नको, रॅडक्लिफ ब्राउन पाहिजे.

के.के. मिश्रा (पृ. १६) नको, मिश्र पाहिजे.

एलियाड (पृ. १८) नको, एलियादे असे रूमेनियन नाव.

गुजरात, गुजराती बरोबर आहे, इतर पर्याय वापरायला नको.

ओरिसा, ओरिया (इंग्रजी) किंवा ओडिसा, ओडिया (स्थानिक) उच्चार (उडिशा, उडिया हे बांगला उच्चार मात्र नकोत.)

एक लहानशी भर : कन्यादानाच्या उलट वळलेला ओघ (पृ. ११). ज्या घरी आपल्या घरची मुलगी दिली, ती जिवंत असताना त्या घरची मुलगी आपल्या घरी करून घेणे या घटनेला मराठीत परतकूळ, परतवेल किंवा साटेलोटे म्हणतात आणि हा प्रकार प्रतिष्ठेचा मानत नाहीत.

एक ढोबळ नजरचूक - 'स्वसा' या शब्दाशी साधर्म्य दाखवणारे शब्द इतर भारतीय भाषांमध्ये आढळतात. (इथे 'इतर इंडो-युरोपियन भाषांमध्ये' असे पाहिजे.) ... इण्डो-युरोपियनच्या मध्यकाळात ही संज्ञा पूर्णपणे वापरातून गेली.



अनुक्रमणिका

(इथे 'इंडो-आर्यनच्या मध्यकाळात' असे पाहिजे) लेखकाने उदाहरणे व विवेचन योग्य प्रकारे केले आहे म्हणून 'नजरचूक' म्हणायचे. याच संदर्भात दुसरी एक गोष्ट नजरेला आणून द्यायची म्हणजे इंडो-आर्यनमध्ये इतर ठिकाणी 'स्वसा' ऐवजी 'भगिनी' आले असले तरी अपवाद म्हणून हिंदी मौसी, मराठी मावशी सारख्या शब्दात 'स्वसा' शिल्लक आहे. (मातृ + स्वसा).

उत्तरात दोघांनी आभार मानले आहेत. महांती पुढे म्हणतात -

'स्वसा / स्वसृ' स्वतंत्रपणे येत नसला तरी तद्‌भव समासात येतात हे खरे. मात्र हिंदी मौसी मध्ये मूळ मातृ-स्वसा नसून (भातृ पासून हिंदी भाई, मराठी भाऊ प्रमाणे) मातृ - स्वसृ असले पाहिजे. शेवटच्या दीर्घ ईला स्त्रीलिंगी प्रत्यय म्हणूनही स्थान असेल. ओडियामध्ये तर माउसि, माउसा, पिउसि, पिउसा असे चार स्वतंत्र शब्द आहेत. (अर्थ अनुक्रमे आईची बहीण, तिचा नवरा, बापाची बहीण, तिचा नवरा.)

(ही चर्चा तिघांच्या इच्छेनुसार 'भाषा आणि जीवन'च्या वाचकांसाठी उपलब्ध करीत आहोत. - संपादक)

■

# स्त्रीणामशिक्षितपटुत्वम्

अपर्णा झा

आमच्याकडे स्वैपाकाचं काम करणाऱ्या इंदुबाई खूप बडबड्या आहेत. त्या कोकणी आहेत. त्यामुळं त्यांच्या बोलण्यात 'मी जातो, मी करतो' असे प्रयोग असतात आणि सर्व 'ळ'च्या जागी त्या 'ल' म्हणतात. कधी कधी एखाद्या इंग्रजी शब्दाचा, त्यांच्या स्वतःच्या वळणानं मराठी शब्द बनवतात, सहजपणे. त्या आहेत अक्षरशत्रू नि अंगठाबहादरीण! विद्यार्थिनींच्या एका वसतिगृहात त्या काम करतात. तिथं तऱ्हेतऱ्हेच्या खाद्यपदार्थांचे वर्ग चालतात. ह्या तिथं मदतीला असतात. माझ्याकडे आल्यावर एकेका पदार्थाची कृती त्या सांगत असतात. परवा अशीच एक कृती सांगत होत्या.

"बाई आज वेगलीवेगली सरबतं बनावली हो. त्यात व्हतं एक मैनाफलाचं सरबत". मी विचारलं - "मैनाफल म्हणजे कोणतं फळ?" त्या म्हणे - "अहो ते आंबटगोड, चकत्या करून खातात ते फल, त्याला काटे असतात वर."

मला समजलं की त्यांना अननस म्हणायचंय. मी म्हटलं "अननस कां?" तर म्हणाल्या "हा तेच अनारस, त्याला तुमच्यावाणी लोक मैनाफल म्हणतात हो."

बाहेरच्या मोरीत त्याच वेळी आमची भांडीवाली - सुलोचना काम करत होती. ती सातवीपर्यंत शिकलेली आहे. तिचं आमच्या बोलण्याकडे लक्ष होतं. इंदुबाई 'मैनाफल' म्हटल्यावर ती आत येऊन म्हणाली - "अहो बाई तुम्ही विंग्रजीत पायन्यापल म्हणताय ना, त्याला इंदुबाई मैनाफल म्हणतात. तुमच्या कसं लक्षात येत नाही?"

हे अशिक्षितपटुत्व माझ्या अतिज्ञानी / अज्ञानी डोक्यात आलं नाही खरं! पण तिनं सांगितल्यावर मात्र तिच्या सुपीक डोक्याचं कौतुक वाटलं. अगदी भाषाशास्त्राच्या मुशीतून बाहेर पडून 'पाईनॅपल'चं 'मैनाफल' झालं!

■

**४६८/१, सदाशिव पेट, पंताचा गोट, पुणे ४११ ०३०.**

**१. 'मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन'ची वर्गणी :**

वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. या त्रैमासिकाचे वर्षात चार अंक निघतात. १ जानेवारी, २००२ पासून वर्गणीचे दर पुढीलप्रमाणे राहतील.

| | | | |
|---|---|---|---|
| वार्षिक वर्गणी - संस्थेला | रु. १२५ फक्त | पंचवार्षिक | रु. ५५० फक्त |
| व्यक्तीला | रु. १०० फक्त | पंचवार्षिक वर्गणी | रु. ४५० फक्त |

**२. आजीव वर्गणी :**

मराठी अभ्यास परिषदेची आजीव सदस्यत्व वर्गणी रु. १०००/-. पूर्वीच्या आजीव सदस्यांनी वर्गणीतील वाढीव रक्कम रु.४००/- भरावी, असे परिषदेतर्फे आवाहन आहे.

**३. पैसे भरण्याबद्दल सूचना :**

वर्गणी प्रत्यक्ष रोखीने किंवा धनादेशाने देता येईल. कृपया मनिऑर्डर पाठवू नये. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ अधिक घालावी. धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे. पावती दिली जाईल. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता याचा उल्लेख करावा.

**वर्गणी व तत्संबंधी पत्रव्यवहाराचा पत्ता :** नीलिमा गुंडी, ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. दू. क्र. ४४८६०१५

**३. मागील अंक :**

'भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) एखाद दुसऱ्या अंकाचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २५/-

**५. प्रकाशने :**

या त्रैमासिकातील निवडक लेखांचे संपादित पुस्तक 'निवडक भाषा आणि जीवन' (किंमत रु. २००) परिषदेच्या कार्यवाहांकडे अथवा मेहता पब्लिशिंग हाउसमध्ये मिळू शकेल. तसेच 'भाषांतरमीमांसा' हे पुस्तकही कार्यवाहांकडे अथवा प्रतिमा प्रकाशनाकडे उपलब्ध आहे.

**६. जाहिरातीसाठी दर :**

पूर्ण पान रु. ७५०/- , अर्धेपान रु. ४००/-, पाव पान रु. २५०/-, शुभेच्छा सूचना रु. १००/-, आवरण पृष्ठ तीन / चार रु. ८००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम, हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

